# काव्यवाहिनी

## खंड पहिला

संपादक
रा. श्री. जोग
कुसुमाग्रज

कॉंटिनेंटल् प्रकाशन, पुणें २

# निवेदन

अर्वाचीन मराठी काव्याचा एक निवडक संग्रह व्हावयास पाहिजे अशी आमची बऱ्याच दिवसांची मनीषा होती. मराठी काव्याच्या नवीन आविष्कारास आतां साठ वर्षे होऊन गेलीं आहेत, आणि ज्यास आज ' नव कविता ' असें म्हणण्यांत येतें असें काव्यहि उदित होत आहे. अर्वाचीन काव्याची परिणति आणि नवीन कवितेचा उदय अशा संधिकालांत आमच्या मनीषेस अधिकच चालना मिळाली आणि तींमधून 'काव्य-वाहिनी'चा उगम झाला. अर्वाचीन कविता प्राधान्यानें भावगीतात्मक आहे; म्हणून या संग्रहांतून भावगीत कविताच यावी ही दृष्टि डोळ्यांपुढें होती. साठ वर्षांतील या काव्यवाहिनीचें रूपदर्शनें एकाच खंडांत करून देणें ही गोष्ट शक्य नव्हती; म्हणून आम्ही तें तीन खंडांमधून करविण्याचें योजिलें आहे. त्यांपैकीं या पहिल्या खंडांत केशवसुत आणि त्यांच्या बरोबर वा मागोमाग काव्यरचना करण्यास प्रारंभ करणाऱ्या कवींच्या कविताच घेण्यांत आल्या आहेत. दुसऱ्या खंडांत गोविंदाग्रज आणि त्यांचे समकालीन कवि यांच्या कवितेचें दर्शन होईल. तिसऱ्या खंडांत रविकिरणमंडळांतील कवि आणि त्यांचे समकालीन यांची कविता येईल. बहुधा आणखीहि एखादा खंड करावा लागेल. आमच्या इच्छेस मूर्त रूप देण्याचें अंगावर घेतल्याबद्दल श्री. अ. अं. कुलकर्णी यांचे आम्ही आभारी आहों त्याचप्रमाणें या खंडांत ज्या कवींचें काव्य आलें आहे, त्यांचा व्यावहारिक वारसा ज्यांच्याकडे आलेला आहे, त्यांनीं त्या त्या कवींच्या कविता घेण्यास अनुमति दिली याबद्दलहि आम्ही त्यांचे ऋणी आहों.

रा. श्री. जोग
कुसुमाग्रज



# तीरावर

इंग्रज राज्यकर्त्यांचा आपल्याशीं जो संबंध आला त्याचे आपल्या जीवनावर उपकार वा अपकार कांहींहि झालेले असोत, आपल्या वाङ्मयाच्या अंगांना आणि उपांगांना त्यामुळें वेगळें वळण लागलें हें निर्विवादपणें खरें आहे. इंग्रज राज्यकर्त्यांमुळें इंग्रजी भाषेचा व तीकरितां इंग्रजी वाङ्मयाचा अभ्यास करणें आपल्यास भाग पडलें, व त्याचा अपरिहार्य परिणाम म्हणून हें झालें. निबंध, कथा, नाट्य इत्यादि इतर वाङ्मयप्रकारांप्रमाणें मराठी काव्यहि या परिणामांतून निसटलें नाहीं. प्रथम 'लेडी ऑफ् द लेक्' किंवा 'प्रिन्सेस्' या इंग्रजी खंडकाव्यांचीं रूपांतरें, किंवा मिल्टन् कवीच्या महाकाव्यकल्पनेस धरून 'राजा शिवाजी' सारखा महाकाव्यलेखनाचा प्रयत्न, नंतर इंग्रजी भावगीतांचीं सरळ भाषांतरें इत्यादि अवस्थांमधून जाऊन १८९० च्या सुमारास इंग्रजी भावगीतांच्या वळणाची मराठी कविता आविर्भूत झाली, या गोष्टी आतां मराठी कवितेच्या अभ्यासकांस परिचित झाल्या आहेत. अर्वाचीन मराठी काव्य-वाहिनीचा उगम येथें झाला. त्यानंतर साठ वर्षांचें एक संवत्सरचक्रहि आज उलटून गेलें आहे. म्हणजे एका प्रकारें एक युगच उलटलें असेंहि म्हणतां येईल. या काव्यवाहिनीच्या जीवनरसांत निमज्जन करण्याची सोय रसिकांना करून द्यावी या हेतूनें तिला घाट बांधून देण्याचा प्रयत्न प्रस्तुत कवितासंग्रहाच्या रूपानें करण्यांत आला आहे.

अर्वाचीन मराठी काव्याच्या इतिहासांत एक काल असा येऊन गेला कीं, ज्यावेळीं त्या काव्याच्या पुरस्कर्त्यांना त्याची वकिली करावी लागे, आणि त्याच्या बाजूनें कैफियत सादर करितांना त्याच्याकडे 'सहानुभूतीनें पहावयास हवें' अशी विनंती रसिकांना करावी लागे. त्यावेळीं प्राक्कालीन कवितेचे अभिमानी "नवीन कवितेकडे खरोखरच 'सहानुभूतीच्या दृष्टीनें' (म्हणजे अनुकंपेनें) पाहण्यासारखीच तिची स्थिति आहे" असें कांहींसें उपरोधानें म्हणत

असत. यांतूनच ‘ प्राचीन कवि विरुद्ध अर्वाचीन कवि ’ असा वाद निर्माण झाला. वादाच्या भरांत नवीन कवितेच्या पुरस्कर्त्यांनीं प्राचीन कवितेवर आघात केले; आणि स्वाभाविक प्रतिक्रिया म्हणून नवीन कवितेवरहि प्रत्याघात झाले. सुदैवानें अर्वाचीन मराठी कविता या अवस्थेमधून आतां बाहेर पडली आहे. तिची वकिली करण्याची आवश्यकता आतां उरलेली नाहीं. बहुसंख्य वाचकवर्ग आज वाचल्यास अर्वाचीन काव्यच वाचतो; किंबहुना उपक्षेचें दुःख जर कोणास सहन करावें लागत असेल, तर तें अर्वाचीन कवितेच्या मानानें प्राचीन कवितेसच अधिक प्रमाणांत सहन करावें लागत आहे. तरुण पिढीस ज्ञानेश्वर–तुकाराम किंवा वामन–मोरोपंत यांच्यापेक्षां तांबे–माधव जूलियन् किंवा यशवंत-गोविंदाग्रज अधिक परिचित आणि प्रिय आहेत. मराठीच्या काव्यसंसारांत गृह-स्वामिनी म्हणून अर्वाचीन कविताच गेल्या अर्ध शतकभर मिरवीत होती.

कवि आणि काव्य यांमध्यें प्राचीन व अर्वाचीन असा भेद करणें हें समंजसपणाचें नाहीं असा पक्ष पूर्वीं मांडिला गेला होता. आजचा अर्वाचीन तो उद्यांचा प्राचीन होतच असतो, काल हें वर्गीकरणाचें तत्त्व होऊं शकत नाहीं, ही दृष्टि या भूमिकेमागें होती. तात्त्विकदृष्ट्या ही भूमिका बरोबर असली तरी तिच्यामध्यें असें गृहीत दिसतें कीं, हे जे दोन वर्ग केले, ते केवळ निर्गुण अशा कालावर आधारलेले आहेत, आणि यांमधील सीमारेषा सदैव संदिग्ध व कालाबरोबर पुढें पुढें सरकणारी असते. वस्तुस्थिति तशी नाहीं. प्राचीन-अर्वाचीन हे भेद केवल कालाधिष्ठित नाहींत. कोठला तरी अर्धशतक वा पावशतकापूर्वीचा कालबिंदु लक्षांत ठेवावयास सोईचा म्हणून तें आरंभस्थान ठरवून कांहीं हे भेद केलेले नाहींत. वाङ्मयाच्या इतिहासांत शतकावारी खंड पाडून केव्हां केव्हां विचार करण्यांत येत असला तरी तसा प्रकार येथें झालेला नाहीं. अर्वाचीन काव्याचें स्वरूप आणि काव्याकडे पाहण्याची कवींची दृष्टि याबाबतींतील भिन्नताच या भेदांच्या मुळाशीं आहे. अर्वाचीन कवितेचें अधिष्ठान प्राचीन काव्याच्या अधिष्ठानापेक्षां वेगळें होतें हेंच हे दोन भेद होण्याचें व त्यांतून वादहि निर्माण होण्याचें कारण होतें असेंहि म्हणतां येईल.

पन्नास वर्षांपूर्वी कवि चंद्रशेखर यांनीं ‘ अर्वाचीन कविता ’ या नांवानें एक

संग्रह संपादिला होता. त्यांनीं अर्वाचीन तत्वाचा अर्थ केवल कालविषयक घेतला व एकोणिसाव्या शतकामधील कवितेचा संग्रह केला. अर्वाचीन कवितेच्या प्रारंभींच्या खऱ्या प्रातिनिधिक अशा केशवसुतादि कवींच्या काव्यास त्या संग्रहांत स्थान मिळालें नव्हतें. स्वतः चंद्रशेखरांना मराठी कवितेस कांहीं निराळें वळण लागत आहे किंवा लागलें आहे याची पुरेशी जाणीव त्या वेळीं झाली नसावी, किंवा झाली असून तिला मान्यता देण्याची तयारी नसावी. म्हणून केशवसुतांच्या कवितेस त्या संग्रहांत स्थान मिळालें नाहीं. पण मराठा कवितेला निराळें वळण लागलें होतें यांत शंका नाहीं. नवीन कवितेचें आरंभस्थान अलीकडे १८८५ हें वर्ष समजण्यांत येतें. कारण अर्वाचीन कवींचे ' कुलगुरु ' केशवसुत यांची पहिली उपलब्ध कविता त्या वर्षींची आहे; पण केशवसुतांनीं काव्य लिहिलें व काव्यास लगेच निराळें वळण लागलें असें अर्थात् होत नाहीं. तथापि स्वतः केशवसुतांनीं पुढील चारपांच वर्षांत नवीन वळण स्वीकारलें ही गोष्ट निश्चित आहे. तेव्हां येथून नवीन कवितेस प्रारंभ झाला असें म्हणणें युक्त ठरतें व त्यानंतर आज साठ वर्षें उलटून गेलीं, तरी हें आरंभस्थान कांहीं कालाबरोबर पुढें ओढतां येणार नाहीं. याचा अर्थ असा कीं, हें अर्वाचीनत्व कांहीं कालाच्या अर्वाचीनत्वावर अधिष्ठित नाहीं. त्या कवितेचें स्वरूपच तिच्या आधींच्या कवितेपेक्षां भिन्न होतें, म्हणून ती भिन्न मानण्यांत आली. हें मानणें असमंजसपणाचें नव्हतें.

अर्वाचीन काव्याचें धांवतें अवलोकन करणारासहि त्याचें बाह्यस्वरूप प्राचीन काव्यापेक्षां पार बदलून गेल्याचें तेव्हांच लक्षांत येतें. साठ वर्षांपूर्वी काव्याचें वाहन बहुतांशीं अक्षरगणवृत्तें हेंच होतें. त्यांच्या जागीं मात्रावृत्तें आणि तांबे-पद्धतीची गीतरचना ही येऊन बसली. आजचा कवि अक्षरगणवृत्ताचा उपयोग सुनीतामधील शार्दूलविक्रीडितामध्यें करील तेवढाच. बाकी वृत्तरचना त्याला माहीत असते असें दिसत नाहीं. अक्षरगणरचनेंत रचनेचीं बंधनें अधिक जाचक असतात. त्या बंधनांतून बाहेर पडण्याकरितां प्रथम मात्रारचनेचा अंगीकार अधिकाधिक प्रमाणांत अर्वाचीन कवींनीं केला. केशवसुतांनीं तीमध्यें नवनवीन प्रकारहि आणले. रचनासौकर्याबरोबर गेयतेकडेहि अधिक आकृष्ट होऊन कवींनीं

तांबेपद्धतीची रागपरीवाही रचना केली. सौकर्याकरितां व सहज आत्माविष्कारा-करितां केशवसुतांनीं मुक्तच्छंद-सदृश रचनेचे प्रयोगहि करून पाहिले. आजचे कवि त्या मुक्तच्छंदाकडे झपाट्यानें वळत असलेले दिसत आहेत. ओवीसारखा रचनादृष्टया सोपा छंदहि ते योजतात असें मधून मधून दिसतें. परंतु पुनः संस्कृतवृत्तरचनेकडे मराठी कविता तोंड वळवील असें वाटत नाहीं. अर्वाचीन कवितेच्या बाह्यरूपांत आणखीहि एक फरक झाला आहे. तो म्हणजे तिच्या विस्तारांत, आकारांत. अलीकडील काव्यांत दीर्घ रचना फार कमी आहे, स्फुट रचनाच फार अधिक आहे ही गोष्ट प्रसिद्धच आहे. या कारणामुळें अर्वाचीन कवींस प्रतिकूल अशीं अनेक विधानें करण्यांत आलीं. कोणी अर्वाचीन कवींची दमछाटच कमी आहे असे उद्गार काढले; कोणी त्यांच्या प्रतिभेच्या उन्मेषास काजव्याचें चमकणें म्हटलें; कोणी त्यांस बिंदुस्रावी कवि म्हणून हिणवलें. काव्य म्हटलें कीं चांगलेंच लांब व भरीव असावें, वाचावयाला प्रारंभ करतांच त्याचा शेवट होऊं नये अशी जुन्या रसिकांची कल्पना असे. अर्वाचीन काव्य आकाराबाबत कमी कमी होत जाऊन आज कणिकादि स्वरूपाच्या चार-पांच ओळींवर येऊन ठेपल्यासारखें वाटतें. फार झाल्यास पांच-सात कडवीं किंवा दहाबारा ओव्या एवढाच त्याचा विस्तार असावा अशी आजची स्थिति आहे. 'जयमंगले'सारखें खंडकाव्यहि स्फुट भावगीतांनीं रचिलेलें दिसतें. काव्याचें हें अगदीं बाह्यरूप सोडून दिलें व त्याची भाषा किंवा अलंकारादि सजावट लक्षांत घेतली, तरी त्याचा थाटमाट फार कमी झाल्याचें दिसून येतें. आपला शब्दसंग्रह समृद्ध व्हावा म्हणून कांहीं कोणी आज काव्याचा अभ्यास करीत नाहीं. अर्वाचीन कवितेची भाषा सुबोध व साधी झाली. अर्वाचीन कवितेचें बाह्यांग ह्याप्रमाणें पार बदलून गेलें.

आणखी एका महत्त्वाच्या बाबतींत अर्वाचीन कविता तत्पूर्व काव्यापेक्षां भिन्न होती व आहे. काव्याचें प्रयोजन काय असावें किंवा असतें याविषयीं संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांनीं कांहींहि सांगून ठेवलें असलें, तरी तें प्राचीन मराठी कवींनीं मान्य केलें होतें असें नाहीं. जुन्या मराठी काव्याचें प्रयोजन परमार्थसाधन व त्या परमार्थाचें साधन म्हणून भक्तिसाधन हेंच एक होतें. 'अलवण हरी-

वीण कविता ' असें वामन पंडित म्हणे, तर ' जेणें भवबंध तुटे । त्या नांव ग्रंथ.' असें रामदास म्हणे. काव्याचें प्रयोजन, उद्दिष्ट वा ध्येय हें भक्तिसाधन ठरल्यामुळें मराठीचें साहित्यशास्त्रहि वेगळें आणि वैशिष्टयपूर्ण झालें आहे असा सिद्धान्तहि अलीकडे मांडिला गेला आहे. काव्याकरितां काव्यलेखन ही दृष्टि प्राचीनांची नसून तें भक्तिसाधनाकरितां, परमार्थसाधनाकरितां हीच दृष्टि मराठी वाङ्मयांत पूर्वींच्या कालीं तरी होती असेंच म्हणावें लागतें. कोणत्याहि कलेचा, विद्येचा किंवा शास्त्राचा खरा विकास त्याच्याकडे साधनाच्या दृष्टीनें पाहून खरोखर साधत नाहीं. त्याचा साध्य म्हणून विचार केला तरच त्याची प्रगति अविच्छिन्न व पराकोटीपर्यंत होऊं शकते. काव्याची गोष्टहि तशीच आहे. साधनापेक्षां साध्य केव्हांहि अधिक महत्त्वाचें असल्यानें तेंच जर काव्येतर असेल, तर त्या मानानें काव्यसौंदर्याकडे दुर्लक्ष होऊन ' वेडें वांकुडें गाईन ' अशी त्याकडे पाहण्याची दृष्टि होते. अशी वृत्ति बहुतेक सर्व प्राचीन कवींची होती. काव्यावर असलेली ही भक्तीची पकड शिथिल झालेली मुक्तेश्वर–रघुनाथपंडित इत्यादि कांहीं कवींच्या बाबत दिसून येते. रामजोशीआदि शाहीर कवींनींहि भक्तीचें हें ओझें बऱ्याच प्रमाणांत झुगारून दिल्याचें दिसतें; परंतु तेहि सर्वस्वीं तिच्या परिणामांतून सुटले होते असें नाहीं. गेल्या शतकांतील पंडित कवि कृष्णशास्त्री चिपळूणकर, कृष्णशास्त्री राजवाडे, पांडुरंगशास्त्री पारखी, गणेशशास्त्री लेले, वासुदेवशास्त्री खरे यांनाहि तीमधून सर्वस्वीं सुटतां आलें नाहीं. निदान नीतिबोधाचें लोढणें तरी त्यांतील अनेकांना स्वीकारावें लागलें. अर्वाचीन कवींनीं काव्याविषयक ही दृष्टि बहुतांशीं सोडली. काव्य हें काव्याकरितां लिहावयाचें, निदान भक्तिसाधनाकरितां तरी नव्हे ही वृत्ति गेल्या साठ वर्षांच्या कालांत उत्तरोत्तर रूढ होऊन आज संपूर्णतः कविमान्य झाली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

ह्या दृष्टिभेदामध्यें आणखीहि एक अर्थ आहे. भक्तिसाधनाच्या वृत्तीमुळें किंवा परमार्थसाधनाच्या इच्छेमुळें माणसाचें मन साहजिकच ऐहिकावरून उडून पार-लौकिकाकडे लागतें, आणि त्याचें प्रतिबिंब त्यानें निर्मिलेल्या काव्यांत आणि वाङ्मयांतहि पडतें. यामुळें प्राचीन काव्याचे विषय अध्यात्मविवेचन वा नीति-

बोध, किंवा ईशचारित्रगान यांपलीकडे फारसे जाऊं शकले नाहींत. लौकिक किंवा ऐहिक विषय आलेच तर अप्रत्यक्षपणें येत. परमेश्वराच्या लीलांचें वर्णन करीत असतां तो ईश्वर आहे याची जाणीव किंचित्काल सुटून तोहि एक मानव आहे, व त्याच्या भावनाहि मानवसदृश आहेत असें वाटून जें वर्णन येई, त्यांत मानवजीवनाचें चित्र कांहीं प्रमाणांत दिसे. परमात्म्याशिवाय दुय्यम दर्जाच्या देवदेवता व पौराणिक व्यक्ति यांच्या कथांमध्यें तें अनेक वेळां होई. तथापि परमेश्वराचें अलौकिकत्व, दैवी सामर्थ्य, कोणत्याहि संकटाचें चुटकी-सरशीं निवारण करण्याची शक्ति या गोष्टी लेखकाच्या डोळयाआड कधींच होऊं न शकल्यानें या वाङ्मयांतील अद्‌भुततेचें किंवा अवास्तवाचें वातावरण कधींच नष्ट झालें नाहीं. पौराणिक कथांऐवजीं मानवी जीवनाच्या कथा वर्णनाचा विषय झाल्याविना कोणत्याहि वाङ्मयांत खऱ्या अर्थानें वास्तवता येऊं शकत नाहीं. मानवी जीवनाचें तें खरेंखुरें चित्र होत नाहीं. अर्वाचीन काव्यानें आपले विषय लौकिकामधून घेतले. आजूबाजूच्या निसर्गांतील निर्झर, कोकिल, गुलाब, फुलराणी, नैऋत्येकडील वारा, किंवा घरगुती जीवनांतील वस्तु आणि प्रसंग यांवरच स्वतंत्र आणि सुटी कविता कवींनीं केली. कित्येक वेळां छत्री किंवा घड्याळ यासारखे लहान विषयहि काव्यरचनेकरितां घेतले गेले व जुन्या कवितेच्या भक्तांकडून याबद्दल थट्टाहि झाली. तथापि ही कविता याच कारणामुळें मानवी जीवनाशीं अधिक निकटत्वानें संबद्ध झाली, त्याची अधिक प्रातिनिधिक झाली. भक्तीच्या पकडींतून झालेल्या काव्याच्या सुटकेचा पहिला परिणाम हा झाला.

या परिणामाचेंच पुढील पर्यवसान म्हणून आणखीहि एक महत्त्वाचा परिणाम मराठी कवितेवर झाला. तो म्हणजे ती आत्मलेखनपर झाली हा होय. आत्मलेखन म्हणजे कवीनें कोणत्याहि विषयासंबंधीं केलेलें स्वतःच्या भावनांचें व विचारांचें स्वतःच्या भावना व विचार म्हणून केलेलें आविष्करण होय. प्राचीन काव्यांत तें भक्तिपर अभंगांतून व कदाचित् अल्पप्रमाणावर लावण्यांतून मात्र होत असे. भक्ति व शृंगार या दोन भावनांखेरीज कवीच्या इतर भावनांचा साक्षात् आविष्कार होत नव्हता. अपत्यवात्सल्य, निसर्गप्रेम

शोकभावना, किंवा वारिकसारिक अनेक कौटुंबिक भाव आपले म्हणून त्यांस प्रगट करितां येत नसत. आपली प्रेमभावनाहि प्रकट करणें हें शिष्टमान्य नसे. राधाकृष्णांच्या नांवाखालीं, किंवा लावण्यांतून अनामिकपणें शृंगाराचा वाटेल तितका सडा घातला तरी चाले, पण स्वतःचें प्रेयसी–पत्नीविषयक साधें सोज्ज्वळ प्रेमहि व्यक्त करणें मान्य होत नसे. अजविलाप वा रतिविलाप वाटेल तितका व तसा लिहा, परंतु कवींनीं स्वतःचा मित्र वा पत्नी यांच्या निधनानें झालेलें दुःख सरळपणें प्रकट करूं नये असा संकेत असे. म्हणून प्राचीन काव्यांत, रूढीमुळें म्हणा वा सुचलें नाहीं म्हणून म्हणा, आपलें मनोगत, आपलीं वैयक्तिक सुखें आणि दुःखें, आपलें स्वतःचें आपल्या लौकिक जीवनाविषयींचें निदान वा मत आपलें म्हणून कोणी व्यक्त केलें नाहीं; प्रत्यक्षपणें तर नाहींच नाहीं. साहित्य व त्यांतहि काव्य हें आत्माविष्काराचें सर्वोत्तम साधन आज मानलें जात आहे. पण स्वतःसंबंधीं लिहिणें हें शिष्टसंमत नसल्यानें चंद्रशेखरादि अर्वाचीन कालांतील कवींचीहि आत्माविष्काराची कुचंबणा झालेली होती. इंग्रजी काव्याच्या आणि त्यांतील भावगीतांच्या वाचनानें अर्वाचीन कवींच्या काव्यदृष्टींत या दृष्टीनें झालेला फरक सर्वांत महत्त्वाचा होय. केशवसुतांच्या अगोदरच भाषांतररूपानें या भावगीतांचा परिचय मराठी वाचकांस वि. मो. महाजनि हे करून देत होते, याचा निर्देश आरंभीं केलाच आहे. त्याचें अनुकरण स्वतःचे विचार व स्वतःच्या भावना व्यक्त करण्याकरितां नवीन मराठी कवि करूं लागले. एक नवीनच प्रांत आपल्या काव्यविहारास मोकळा झाला असें त्यास वाटूं लागलें व मोठ्या कुचंबणेंतून सुटल्यासारखें वाटलें. दत्त, टिळक, माधवानुज, रेंदाळकर, गोविंदाग्रज, बालकवि हे आणि नंतर रविकिरणमंडळाच्या पिढींतील कवि यांनीं या स्वातंत्र्याचा संपूर्णपणें लाभ घेतला. त्यावेळची कविता पाहिली, तर कवि हा ' मी ' चा उपयोग किती मोकळेपणानें करूं लागला होता याची कल्पना येईल. एका केशवसुतांच्या कवितेमधील पुढील वचनें पाहिलीं कीं आत्माविष्काराकरितां कवि कसा स्वतंत्र झाला होता तें समजून येतें. " पुष्पा ! सुंदर किति तूं असशी ! तुजला बघतां मन माझें तूं वेडें रे करिसी; " " नदीच्या तीरानें सहल करितां **मी**

जिवलगे ! " " फिरायास **मी** मित्र घेवोनि गेलों." " **मी**हि कशाला येथ रहावें। काय असें ज्या **मीं** चिकटावें;" " संसारा **मी** समर गणीं;" " म्हण **मला** आपुला प्रिय जिवलग, हे मधुरे;" " ब्राह्मण नाहीं, हिंदुहि नाहीं, न **मी** एक पंथाचा," **अस्मदीय** हृदयीं भरलें कीं जग हें दुःखें भरलें." इत्यादि. केशवसुतांपूर्वीच्या निकटच्या कालांत हें आत्माविष्काराचें स्वातंत्र्य कवीला असल्याचें अथवा त्यांनीं घेतल्याचें दिसत नाहीं. केशवसुतांच्या नंतरच्या चंद्रशेखरांच्या काव्यांतील आत्मपरतेच्या सापेक्ष अभावाचें समर्थन करतांना त्यांचे शिष्य घाटे यांना म्हणावें लागलें कीं स्वतःच्या जीवनाचें स्पष्ट चित्र वाङ्मयामध्यें चित्रित करणें म्हणजे चारचौघांत वस्त्रें फेकून देऊन नागवें हिंडण्यासारखें त्यांना वाटे. नवीन कवींनीं स्वतःस केशवसुतांचे चेले म्हणवून घेण्यास प्रारंभ करण्याचें एक महत्त्वाचें कारण म्हणजे त्यांनीं कवींस स्वतःचीं सुखें व दुःखें, भाव आणि भावना, मतें आणि विचार आपले स्वतःचे म्हणून उघडपणें सांगण्याचा पायंडा घालून देऊन आत्माविष्काराचा मार्ग मोकळा करून दिला. याला 'नागवें हिंडणें' म्हणणें हें पूर्वीच्या व्यक्तींवर असलेल्या आत्माविष्कारावरील बंधनाचें द्योतक आहे. हें बंधन तोडून व्यक्तीनें स्वातंत्र्याचा अवलंब केला. याचें दर्शन अर्वाचीन कवितेंत होऊं लागल्यानें अर्वाचीन काव्याला जुन्या रसिकांनीं नाकें मुरडलीं. पण अर्वाचीन कवींपैकीं अनेकांना हा मार्ग पटला व आज तरी काव्याचा उपयोग मुख्यतः आत्मलेखनाकरितांच होत आहे.

आत्माविष्काराचें हें स्वातंत्र्य खरोखर सर्व स्वातंत्र्याचें अधिष्ठान, मूळ व फल आहे. तेव्हां कवींना मिळालेल्या या स्वातंत्र्याचें पर्यवसान त्यांनीं सर्व प्रकारच्या स्वातंत्र्याचा पुरस्कार करण्यांत झालें असल्यास तें स्वाभाविकच होतें. तो पुरस्कार अर्वाचीन कवींनीं केला यांत शंका नाहीं. त्यांत सामाजिक स्वातंत्र्य म्हणजे सामाजिक रूढींच्या दडपणांतून सुटका या अंगास विशेष महत्त्व मिळालें व त्या स्वातंत्र्याचें एक अंग म्हणून प्रेमस्वातंत्र्याचाहि विशेष पुरस्कार झाला हेंहि खरें. सामाजिक स्वातंत्र्याबरोबरच धर्मविषयक स्वातंत्र्याचा पुरस्कार अर्वाचीन कवितेनें केला. तितक्या प्रमाणांत नसलें तरी राजकीय स्वातंत्र्याचें प्रतिपादन करणारे विनायक–गोविंद–सावरकर–अज्ञातवासी–तिवारी या कवींचीहि

एक परंपरा कवितेच्या अर्वाचीन परंपरेचाच भाग म्हणावयास हवी. तिला जुन्या परंपरेंत घालतां येणार नाहीं. काव्यरचनेबाबत घेतलें जाणारें स्वातंत्र्य अर्थात् आलेंच. सारांश, स्वातंत्र्याचा सर्वांगीण पुरस्कार व त्यांतल्यात्यांत सामाजिक निर्बंधांतून व्यक्तीस हव्या असलेल्या स्वातंत्र्याचा पुरस्कार! अर्वाचीन कवितेनें केला, आणि तेंच तिचें गेल्या साठ वर्षांतील अधिष्ठान राहिलें.

यासंबंधांत अर्वाचीन काव्याच्या आरंभकालाच्या वेळची महाराष्ट्र समाजाची वैचारिक परिस्थिति लक्षांत घेणें योग्य होईल. नवसुशिक्षितांची पहिली पिढी बहुतेक सारे आपले विचार पाश्चात्य विचारावरून बनवीत असे. त्या विचारांत म्हणजे मुख्यतः इंग्लंडमधील विचारांत व्यक्तिस्वातंत्र्यावर अधिष्ठित असलेल्या उदारमतवादाचाच पगडा अधिक होता. आगरकरादि सुधारक मंडळी व्यक्ति-स्वातंत्र्य आणि तन्मूलक सामाजिक सुधारणा यांचें प्रतिपादन करीत होती. फ्रान्समध्यें एक शतकापूर्वी क्रांतिकाळांत उद्घोषित झालेली स्वातंत्र्य, समता व बंधुता ही तत्त्वत्रयी आपल्याकडे नव्यानेंच आली होती. अशा वातावरणांत वाढलेला अर्वाचीन कवि कळत वा नकळत स्त्रीस्वातंत्र्याचा, धर्मस्वातंत्र्याचा, सामाजिक रूढींपासून मुक्त होण्याचा पुरस्कार करणारा असावयाचाच. त्याला हास्यविषय करण्याकरितां इतर वाङ्मयांत त्याचें जें चित्र काढलें जाई, त्याचा अर्थ तो उदारमतवादी सुधारक असे हाच होता. या उदारमतवादाच्या मुळाशीं स्वातंत्र्याची आकांक्षा होती. तिचा आविष्कार निरनिराळ्या प्रकारांनीं त्याच्या काव्यांत होई. नवीन काव्याच्या पटाचा आडवा-उभा धागा या स्वातंत्र्याच्या आकांक्षेनें, विशेषतः व्यक्तिस्वातंत्र्याच्या आकांक्षेनें विणला गेला होता.

व्यक्तिस्वातंत्र्याच्या या पुरस्कारांत धर्म आणि समाज यांच्या बंधनांतून मुक्त होण्यावर अर्वाचीन काव्यांत अधिक भर देण्यांत आला ही गोष्ट खरी आहे. यामुळें अर्वाचीन कविता महाराष्ट्राच्या राजकीय आकांक्षांशीं समरस झाली नाहीं अशा स्वरूपाचा आक्षेपहि तिजवर आला आहे. या घटनेचा उलगडा महाराष्ट्रीय समाजाची गेल्या शतकाच्या द्वितीय व तृतीय पादांतील मनोभूमिका पाहिल्यास होण्यासारखा आहे. या काळांत मिशनरी लोक हिंदु-धर्माविरुद्ध प्रचार करीत होते, बाबा पदमनजीसारखे या प्रचारास बळी पडलेले

लोक स्वधर्मावर आघात आणि परधर्माचा पुरस्कार करीत होते. स्वधर्म न सोडतांहि प्रचलित सामाजिक रूढि आणि तन्मूलक अन्याय व कुचंबगा यांविरुद्ध जोतिबा फुले आणि लोकहितवादी यांनीं कोरडे ओढून या प्रचारास हातभार लावला होता. राजकीय स्वातंत्र्य नुकतेंच नष्ट झालें असूनहि त्याबद्दल विशेष दुःख न होतां कांहीं काळ कांहीं बाबतींत तरी परकीयांचें राज्य सुखावह वाटावें अशी स्थिति होती. स्वराज्य होतें तेव्हांहि धार्मिक व सामाजिक बाबतींत व्यक्ति समाजाच्या किंवा रूढ कल्पनांच्या गुलामगिरींतच होती. दररोजच्या जीवनांत सामान्य व्यक्तीस राजकीय पारतंत्र्यापेक्षां धार्मिक आणि सामाजिक बंधनांचाच जाच अधिक प्रत्ययास येई. बारिकसारिक गोष्टींत जेथें राजकारणाचा शिरकाव होत नाहीं, अशाहि बाबतींत आमच्या धर्माला आणि समाजाला कांहीं म्हणावयाचें असेच. बाहेरच्या गुलामगिरीपेक्षा व्यक्तीला ही घरची गुलामगिरीच अधिक तापद वाटे. म्हणून संधि मिळाल्याबरोबर तीविरुद्ध सुधारकवर्गानें बंड उभारलें. इंग्रज राज्यकर्त्यांच्या हातांत सत्ता गेल्यावर धार्मिक व सामाजिक कार्यांत आपण हात घालणार नसल्याचें त्यांनीं जाहीर केलें. त्यामुळें धर्म व समाज यांस राजसत्तेचें पाठबळ मिळेनासें झालें. व्यक्तीला समाजाविरुद्ध आणि धर्माविरुद्ध बंड करण्यास साहजिकच उत्तेजन मिळालें व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनांनीं प्रेरित झालेल्या नवसुशिक्षितांनीं व त्यांत कर्त्रींनीहि या ‘ बंडाचा झेंडा ’ उभारला. बाहेरची गुलामगिरी नष्ट करावयाची असेल तर घरची गुलामगिरीहि नष्ट झाली पाहिजे असा पुकारा आगरकरांनीं केला. या बंडाचा उपयोग शरीरानें नसला, तरी मनानें मनुष्य स्वतंत्र होण्याच्या दृष्टीनें खास झाला. जो मनानें स्वतंत्र झालेला नाहीं, तो देशाच्या स्वातंत्र्याच्या लढयांत खऱ्या हिरीरीनें भाग घेऊं शकणार नाहीं. धर्माचाराच्या व समाजरूढींच्या पकडींतून मुक्त होऊनहि परकीयांच्या सत्तेचें जोखड कायम राहिल्यास व्यक्ति-स्वातंत्र्य अपूर्ण व सदोष राहतें हें पटून समाजसुधारकमुद्धां स्वातंत्र्याच्या लढयांत भाग घेऊं लागतो. अलीकडील स्वातंत्र्यसमरामध्यें ब्राह्मण-अब्राह्मण, सुधारक-दुर्धारक, स्त्री आणि पुरुष सर्वच भाग घेऊं लागले, याचें बरेंच श्रेय गेल्या शतकांतील उत्तरार्धांत आणि या शतकांतील पहिल्या पादांत व्यक्ति-

स्वातंत्र्याचें जें प्रतिपादन झालें त्याला आहे. या प्रतिपादनांत अर्वाचीन काव्यानेंहि आपला वांटा उचलला. तें प्रतिपादन कसें झालें तें आपण थोडें तपशीलवार पाहूं.

व्यक्तिस्वातंत्र्याच्या चळवळीस कवींनीं काव्यरचनेपासूनच प्रारंभ केला व तो केशवसुतांपासूनच झाला. ' अशी असावी कविता, फिरून । तशी नसावी कविता, म्हणून ॥ सांगावया कोण तुम्ही कवीला । आहांत मोठे पुसतों तुम्हांला॥ असें त्यांनीं म्हटल्यापासून काव्यविषयक बंधनें शिथिल होऊं लागलीं. काव्य हें काव्याकरितांच असतें अशा आशयाचा विचारहि त्यांनीं त्याचवेळीं सांगितला. ' करूनिया काव्य जनांत आणणें । न मुख्य हा हेतु तदीय मी म्हणें ॥ करूनि तें दंग मनांत गुंगणें । तदीय हा सुंदर हेतु मी म्हणें. असें म्हणून काव्य-स्वातंत्र्याच्या या कल्पनेला धरून त्यांनीं वागण्यांसहि आरंभ केला. गणवृत्तरच-नेचीं जरा कडक बंधनें सोडून देऊन विविध मात्रारचनाच त्यांनीं पुढें पुढें अधिक केली. रचनाविषयक जेवढे नवनवीन प्रयोग केशवसुतांनीं केले तेवढे इतर कोणत्याहि कवीनें केले नाहींत. श्लोकाचा ठराविकपणा काढून टाकण्या-करितां ' वृत्तवैचित्र्या 'चा अवलंब करावा, त्यांतील चार चरणांची ठराविक संख्या बदलून ती कमी अधिक करावी, त्या चरणांची लांबीहि कमीअधिक ठेवावी, यमकांच्या रचनेंत निराळेपणा आणावा इत्यादि प्रयोगांनीं कवितेचें बाह्यरूप बदलण्याचा केशवसुतांनीं फार प्रयत्न केला. वॉल्ट् व्हिट्मनच्या धर्तीवर मुक्तच्छंदसदृश रचनाहि त्यांनीं करून पाहिली होती. त्यांच्या पाठीमागें रेंदाळकर-नागेशआदि कवींनीं यमकांचें बंधन तोडून निर्यमक रचनाहि केली. यमकांच्या बंधनांतून सुटण्याचा आणखी एक प्रयत्न वैनायक वृत्तरचनेंत सावरकरांनीं केला व इंग्रजी Blank Verse मराठीमध्यें उतरली. यमकाचेंच काय, पण इतरहि बहुतेक बंधनें बाजूस ठेवून आज मुक्तच्छंद रूढ झाला आहे. काव्याकरितां पद्याऐवजीं गद्याचा उपयोगहि होऊन रचनेबाबत तरी संपूर्ण स्वातंत्र्य आजच्या मराठी काव्यास लाभलें आहे.

काव्यरचनेंतील स्वातंत्र्य हा अर्थात् स्वातंत्र्याचा गौण भाग झाला. खरें स्वातंत्र्य म्हणजे व्यक्तिजीवनांतील स्वातंत्र्य होय. हें स्वातंत्र्य धार्मिक, सामा-

जिक व राजकीय असें अनेकविध असल्याचा निर्देश मागें आलाच आहे. प्राचीन काव्यांत धर्मविचाराचेंच प्राधान्य असल्यानें धर्मविरोधी कल्पना आणि उद्‌गार यांना त्यांत मुळींच स्थान नव्हतें. अनेक शतकांच्या कालावधींत धर्माचारांना शृंखलांचें स्वरूप आल्यानें त्याचा व्यक्तिजीवनावरील जुलूम असह्य झाला होता. धर्म नीतीला विरोधी न होतां तिच्यावर अधिष्ठित असला पाहिजे हें विसरून धर्माचारांना अवास्तव व अहितकारक महत्त्व प्राप्त झालेलें होतें. धर्म आणि नीति यांमध्यें पाश्चात्य तत्त्वज्ञानांत मानलेला भेद लक्षांत घेऊन केशवसुत म्हणाले, " धर्माचें माजवूनि डंबर, नीतीला आणिती अडथळे; विसरुनियां हे जातात खुळे, नीतीचें पद जेथें न ढळे, धर्म होतसे तेथेंच स्थिर. " तसेंच " नियमन मनुजासाठीं, मानव नसे नियमनासाठीं " असेंहि त्यांनीं सांगून ठेवलें. " धर्मादि प्रेत झालेल्या शब्दांचीं बेफाम भुतें नाचविती " अशी बी कवींनीं तक्रार केली. " धर्म तुम्हांसाठीं बनला, धर्म तुम्ही तुमचा केला, " असें सांगून धर्माचारांची माती घेऊन बसण्यांत अर्थ नसल्याचें बालकवींनीं सुनावलें. " मेल्या धर्माचें हें भूत, पाहुनि कां रे बसलां भीत " असा प्रश्न गोविंदाग्रजांनीं केला. आपला जुना धर्म सोडून देऊन दुसरा, विशेषतः खिस्ती, धर्म स्वीकारण्याची जी एक लाट महाराष्ट्रांतील शिक्षितांवर येऊन गेली, त्या लाटेंत अर्वाचीन कवींपैकीं टिळक हेहि सांपडले होते. पण दुसरा धर्म स्वीकारण्याची तयारी नसलेले, किंबहुना धर्मातीत होऊं पाहणारे कवि अनेक होते. न्यायमूर्ति रानड्यांप्रमाणेंच केशवसुतांनीं ' ब्राह्मण नाहीं, हिंदुहि नाहीं, न मी एक पंथाचा ' असें जाहीर केलें होतें. त्यांची साथ करणारे पुढील पिढींतील रेंदाळकरहि 'नोहे हिंदुहि, जैन मी न, अथवा बुद्धैकसेवी तसा। खिस्ताचा चिरशिष्य मी न अथवा इस्लामधर्मानुग' असें आपलें वर्णन करितात. ख्रिस्तधर्माचा स्वीकार करूनहि टिळकांनीं ' न ब्राह्मण वा महार मी। जन्मभूमिसेवाधर्मी ' असें आपल्या धर्माचें वर्णन केलें. धर्माचा आधार जो ईश्वर त्याच्या न्यायीपणाविषयींचा व कृपालुत्वाविषयींचा संदेह केशवसुतांच्या आधींच गो. वा. कानिटकर यांनी आपल्या ' संमोहलहरी ' मध्यें प्रकट केला होता. स्पेन्सरचा अज्ञेयवाद आगरकरांमार्फत केशवसुतांनींहि स्वीकारला असावा असें ' अज्ञेयावरती जसें क्षणिक हें अस्तित्व

हो खेळतें ' असें आपल्या जीवनाविषयीं त्यांनीं म्हटलें आहे त्यावरून वाटतें. धर्मावर डळमळीत कां होईना, पण श्रद्धा असूनहि देवदेवतांच्या नैतिक दृष्टया अयोग्य असणाऱ्या गोष्टींवर नेमकें बोट ठेवून गोविंदाग्रजांनीं स्वतःस पावित्र्यविडंबनाच्या दोषास पात्र ठरविलें. पटवर्धनांनीं ' फटकळ अभंग ' लिहून पांडुरंगाची हजेरी घेतली व त्याला दुरूनच वन्दीन असें म्हटलें. धर्माधार परमेश्वराचीच अशी अनुकंपनीय स्थिति आज झाली असल्यानें धर्माच्या बाबतींत कविजनांनीं संपूर्ण स्वातंत्र्य मिळवून ठेवलें असल्यास नवल नाहीं.

आपल्याकडे धर्माचा विचार सामाजिक विचाराहून वेगळा काढून क्वचितच करितां येत असल्यानें अर्वाचीन कवींनीं धर्म व समाज आणि त्याचा आचार व रूढि यांचा एकत्रच उल्लेख करून त्यांविरुद्ध बंड उभारलें होतें. पाश्चात्यांच्या स्वातंत्र्य, समता व बंधुता यांपैकीं ' समता व बंधुता ( Equality and Fraternity ) या दोन तत्त्वांच्या अनुरोधानें नवीन सामाजिक कल्पना रूढ होऊं लागल्या होत्या. समाजांतील जातिभेद आणि विषमता हीं नाहींशीं झालीं पाहिजेत हें सुधारणेचें महत्त्वाचें अंग कवींनाहि मान्य होतें. केशवसुतांनीं ' अंत्यजाच्या मुलाचा पहिला प्रश्न ' कवितेंत निबद्ध केल्यापासून केवळ स्पृश्या-स्पृश्यभेदच नव्हे, तर सर्वत्र जातिभेद अमान्य असल्याचें नवीन कवींनीं जाहीर केलें. टिळकांच्या कवितेचा उल्लेख वर आलाच आहे. बी कवींनींहि जातिभेदा-विरुद्ध असणारी आपली तीव्र भावना ' जन्मानें अधिकारजाति ठरते, जन्मेंचि नीचोत्तम । वज्राभेद्य समाजधोरण असें झालें जिथें कायम । तेथें शुद्ध समाज-नीति, समता, सत्प्रेरणा नांदती । आढ्योक्तिप्रति ह्या मृषा करितसे प्रत्यक्ष सद्यः स्थिति ' या ओळींत प्रकट केली आहे, आणि ' ही कालोपहता समाजघटना कामा न ये सांप्रत ' असा स्पष्ट अभिप्राय दिला आहे. जातीय विषमतेबरोबर आर्थिक विषमतेचीहि जाणीव असल्याचें ' मजुरावरील उपासमारीच्या पाळी'चें वर्णन करून केशवसुतांनीं सुचविलें होतें; पण अर्वाचीन कवींच्या पहिल्या पिढींत यासंबंधीं तितकीशी तीव्र आस्था प्रकट झाली नाहीं. पहिल्या महायुद्धोत्तर काळांत काणेकरादिकांच्या ' कवनें ' व ' दोन देशभक्त ' इत्यादि कवितांतून ती प्रकट होऊं लागली. तथापि सामाजिक आणि आर्थिक या दोन विषमतांपेक्षांहि

स्त्री आणि पुरुष यांमधील विषमता मात्र अधिकच प्रमाणांत काव्याचा विषय झालेली दिसते. व्यक्तिस्वातंत्र्याचा सर्वांत अधिक अपहार स्त्रीच्या बाबतींत झाला होता. तेव्हां त्याचा उल्लेख पुष्कळ व्यक्तिस्वातंत्र्याकांक्षी अर्वाचीन कवींच्या काव्यांत यावा हें अगदीं स्वाभाविक होतें. केशवसुतांनीं आपल्या ' तुतारी ' या कवितेच्या पहिल्या आवृत्तींत याचा उल्लेख पुढीलप्रमाणें केला आहे:— ' स्त्रीवर्गाला दास्यीं दडपुनि, दासीपुत्रचि मानव होतो, स्त्रीला अज्ञानांत ठेवितो परिणामीं दुर्दशेस जातो '—किंवा ' पत्नीनिधनीं अन्य वरी नर, परि पति मरतां स्त्रीचा तीतें बळेंचि देतो संन्यासातें. ' इत्यादि. गोविंदाग्रजांनींहि ' दोन पतींनीं विधवा न सती । पतिव्रतेला परि पांच पती ' आणि ' नीतिसाठीं वपन मांडिती, प्रेताहातीं नवरी देती, अनाथ विधवा पदीं चिरडती ' असें त्या परिस्थितीचें चित्रून वर्णन केलें आहे. नवीन कवितेनें स्त्रियांचा घेतलेला हा कैवार समता आणि व्यक्तिस्वातंत्र्य या कल्पनांवरच अधिष्ठित झाला होता.

सामाजिक क्षेत्रांत वैयक्तिक स्वातंत्र्याचा आणखी एक भाग येतो. तो म्हणजे प्रेमस्वातंत्र्याचा होय. स्त्रीला काय किंवा पुरुषाला काय, आपल्या मनास आलेल्या व्यक्तीवर प्रेम करून तिच्याशीं विवाहबद्ध होण्याचें स्वातंत्र्य असल्याविना व्यक्तिस्वातंत्र्याची खरी पूर्तताच होऊं शकत नाहीं. ज्या व्यक्तीच्या अगदीं निकट सहवासांत आपलें सारें जीवन व्यतीत करावयाचें, त्या व्यक्तीच्या निवडींत स्वतःस जर स्वातंत्र्य नसेल, तर इतर क्षेत्रांतील स्वातंत्र्याची फारशी मातब्बरी उरत नाहीं. प्रेमविवाह हा विवाहाचा सर्वोत्तम प्रकार आहे, त्यांत व्यक्तित्वाचा संपूर्ण विकास होऊं शकतो आणि वैवाहिक जीवनाचें खरें साफल्य होतें अशी विचारपूर्वक खात्री पटल्यामुळें आगरकरांनीं स्वयंवराचा पुरस्कार केला होता. पूर्वीच्या काव्यांत स्वयंवरकथा आहेत, पण गेल्या शतकाच्या अखेरीपर्यंत सामान्य सामाजिक आचारांत स्वयंवर अगदींच अपवादभूत होतें. बालविवाहामुळें स्वयंवराचा संभवच नव्हता. इंग्रजी प्रेमकाव्याच्या वाचनानें प्रेमाच्या कल्पना आत्मसात् करून अर्वाचीन कवींनींहि प्रेमस्वातंत्र्याचा पुरस्कार आपल्या काव्यांत केला. निदान प्रेमविषयक रचना आत्मलेखनाच्या पद्धतीनें केली. जुन्या कल्पनांप्रमाणें हा मोठाच अपराध होता. लिहावयाचेंच तर आधीं भक्तिपर

लिहावें, शृंगाराचें वर्णन करावयाचें तर निदान पौराणिक व्यक्तींचा शृंगार असावा, पण आपल्याच प्रेमभावना वर्णन कराव्या हें अब्रह्मण्यम् होतें. केशवसुतांनीं स्वतःच्याच प्रेमभावना वर्णिल्या असें जरी म्हणतां न आलें, तरी त्या आपल्या म्हणून वर्णिल्या, व प्रेमाच्या बाबतींत आत्मलेखन करण्याबाबत पूर्वी वाटणारी ओशाळगत नाहींशीं केली. कदाचित् त्या वैयक्तिक नव्हत्या, म्हणूनच प्रथम-पुरुषीं सांगितल्यानें फारसा आक्षेप आला नसावा. केशवसुतांच्या उदाहरणानें नंतर आलेल्या कवींचा मार्ग मोकळा झाला, व त्याचा त्यांनीं भरपूर फायदाहि घेतला. पण पाश्चात्य वाङ्मयांतून घेतलेल्या या कल्पनांचा प्रत्यक्षांत आचार करण्यासारखी सामाजिक परिस्थिति प्रगत झालेली नसल्यानें अनेक कवींच्या पदरीं याबाबत नैराश्यच आलें, व त्यांच्या काव्यावर त्याची छायाहि पडली.

धर्म, सामाजिक जीवन व प्रेम यांबाबत व्यक्तीचा आणि समाजाचा विरोध असल्याचें दृश्य अर्वाचीन काव्यांत आणि वाङ्मयांत दिसून येतें. व्यक्ति या समाजाचाच घटक असतात आणि समाज हा व्यक्तींचाच बनलेला असतो, असें असतां समाजाला जबाबदार धरून अमूर्त अशा समाजपुरुषावर या वाङ्मयांत प्रहार केले गेले ही गोष्ट चमत्कारिक आणि अजाणपणाची द्योतक वाटणें शक्य आहे. थोडा विचार केला असतां त्यामध्यें आश्चर्य करण्याजोगें कांहीं नाहीं. व्यक्तीचें मन आणि समुदायाचें मन हीं वेगवेगळीं करण्याची प्रथा आजच्या मानसशास्त्रास मान्य आहे. जी गोष्ट एकेक व्यक्ति एकटेपणानें करूं धजत नाहीं, तीच समुदायांत असतांना ती व्यक्ति खुशाल करूं शकते असा अनुभव येतो. समाजाचें किंवा लोकमताचें दडपण कोणा एका व्यक्तीचें नसलें तरी समुदायाचें मिळून असूं शकतें. लोक काय म्हणतील, जग काय म्हणेल अशी सामुदायिक भीतीच माणसाला दडपून टाकते, व मनाला व्यक्तिशः पटणाऱ्या सुधारणा मनुष्य समाजाच्या भीतीमुळें व्यवहारांत आणूं शकत नाहीं. तेव्हां आगरकरांनी किंवा अर्वाचीन कवींनीं जेव्हां समाजपुरुषाला उद्देशून कांहीं म्हटलें, तेव्हां डोळ्यांपुढें अमुकच एक व्यक्ति नसूनहि परिणामाच्या दृष्टीनें व्यक्तीला पदोपदीं बंधन घालणाऱ्या समुदायाला उद्देशून तें असे. व्यक्ति आणि समाज यांमधील विरोध कल्पनेनें आक-

लनीय असा आहे, केवळ काल्पनिक म्हणजे मिथ्या नव्हता. प्रत्यक्षांत अनुभवानें खरा ठरलेला होता.

व्यक्तिस्वातंत्र्याच्या आकांक्षांनीं प्रेरित झालेल्या अर्वाचिन कवींना दैनंदिन जीवनांत ज्याप्रमाणें धर्मविरोध आणि समाजविरोध पदोपदीं अनुभवास येई, तसा आणि तेवढ्या प्रमाणांत राजविरोध येत नसल्यानें राजकीय पारतंत्र्याकडे त्यांचें जावें तसें लक्ष गेलें नाहीं हें खरें. व्यक्तीचा आणि राजाचा, किंवा राजपुरुषांचा, म्हणजे राजसत्तेचा प्रत्यक्ष विरोध फार झाल्यास लहानलहान संस्थानांतून प्रत्ययास येई. एरवीं राजसत्ता व तिचें अफाट यंत्र यांचा सामान्य व्यक्तीशीं प्रत्यक्ष संबंध क्वचितच येई, व राजकीय पारतंत्र्याची बोचणी मधून मधून व दूरतःच प्रत्ययास येई. असें असलें तरी याहीबाबत स्वातंत्र्याकांक्षेस अनुकूल अशीच वृत्ति अर्वाचीन कवींनीं ठेवलेली होती. केशवसुतांच्या ' एका भारतीयाचे उद्गार,' ' गांवीं गेलेल्या मित्राची खोली लागलेली पाहून ' किंवा 'कवितेचें प्रयोजन' इत्यादि कवितांतून पारतंत्र्याची तीव्र जाणीव असलेली स्पष्ट दिसते. अर्वाचीन कवींतहि विनायक–सावरकर, गोविंद–तिवारी इत्यादि राष्ट्रीय काव्यरचना करणारांची परंपरा झालीच. या परंपरेला प्राचीन परंपरा म्हणतां येणार नाहीं. इतरांनींहि फूल ना फुलाची पाकळी वाहिली आहेच. प्रश्न आहे तो भर कशावर दिला याचा. वस्तुतः सर्वच विचार राष्ट्रीय होय. सामाजिक सुधारणा वा धर्मसुधारणा अ-राष्ट्रीय ठरवून बाजूला ठेवून चालण्यासारखें नव्हतें. सर्वच प्रकारच्या स्वातंत्र्यांत अर्थात् राजकीय स्वातंत्र्याचा समावेश होईच. धर्माचा आणि समाजाचा गुलाम राहून राजकीय स्वातंत्र्यांतहि खऱ्या अर्थानें व्यक्ति स्वतंत्र असूं शकत नाहीं. सामाजिक स्वातंत्र्य मिळविण्याचा प्रयत्न राजकीय स्वातंत्र्यास विरोधक न होतां पोषकच झाला.

अर्वाचीन काव्य प्रणयप्रधान आहे असा त्यावर एक मोठा आक्षेप घेण्यांत आला आहे. तें प्रणयप्रधान असलें तरी प्राचीन प्रणयापेक्षां हा प्रणय वेगळा आहे हें मात्र हा आक्षेप घेतांना लक्षांत घेण्यांत येत नाहीं. प्राचीन काव्यांतील प्रणयाची कल्पना उपभोगप्रधान शारीर प्रणयाची आहे याविषयीं मतभेद होऊं

नये. या शारीर कल्पनेनें भक्तिपर काव्यांतहि रूपकाच्या किंवा इतर कांहीं रूपानें प्रवेश केलेला दिसतो. भक्तीशिवाय इतर प्रणयकाव्यांत त्याचें स्वरूप अति उत्तान, अनेक वेळां अश्लील, कित्येक वेळां बीभत्स असलेलें दिसून येतें. स्त्री ही पुरुषाच्या बरोबरीची असल्याची भावना अस्तित्वांत नसल्यानें ती एक उपभोगाचा विषय असल्याप्रमाणें तिचें व तिच्या सौंदर्याचें वर्णन व्हावें हें साहजिकच होतें. स्त्रीविषयक ही दृष्टि बदलल्याचें अर्वाचीन काळांत व काव्यांत स्पष्ट दिसतें. त्यामुळें नवीन प्रेमांत वा प्रणयांत मोकळेपणा असला तरी शारीर भाग फारच कमी असे, व मानसिक वा बौद्धिक प्रेमासच प्राधान्य मिळालें होतें. विषय एकच असून विठ्ठल कवींचें बिल्हणचरित्र आणि यशवंतांचें जयमंगला या दोन काव्यांत या दृष्टीनें जें महदंतर पडलें आहे तें यामुळेंच. उदात्त, निःस्वार्थ अशा प्रेमाचें गायन मराठी गद्यापेक्षां अर्वाचीन मराठी काव्यांतच अधिक झालेलें दिसेल. ‘ प्रेम होईना तुझ्यानें, प्रेम माझें राहुं दे ’ असें म्हणणारी निःस्वार्थता त्यांतच दिसते. त्याचप्रमाणें अनैतिक प्रेमाचा पुरस्कार किंवा चित्रण झालें असल्यास अगदींच अपवादभूत म्हणावें लागेल. शुद्ध प्रेमाची ही कल्पना दौर्बल्याची द्योतक असल्याचेंहि सूचित करण्यांत आलें आहे; पण अहिंसेलाहि दुबळी म्हणणारा वर्ग आहेच. आधुनिक कवींचा शृंगार म्हणजे शृंगार नव्हेच असेंहि कोणी म्हणतात; परंतु तात्त्विक दृष्ट्या अर्वाचीन काव्यांतील प्रेम अधिक उदात्त आणि विशुद्ध आहे हें सर्वांसच मान्य करावें लागेल.

अर्वाचीन कविता म्हणजे इंग्रजी रोमँटिक काव्याचा मराठीमधील अवतार असेंहि म्हणतां येईल. नवीन मराठी कवींपुढें शेली, कीट्स्, वर्ड्स्वर्थ इत्यादि कवींचें काव्य होतें यांत शंका नाहीं. सामाजिक बंधनांतून मुक्तता, व्यक्ति-स्वातंत्र्य, ठराविकाच्या बाहेर पडण्याची इच्छा, प्रेमविषयक आविष्कार, अलौकिकाबद्दलची अनामिक हुरहूर, निसर्गाबद्दलचें प्रेम, सौंदर्यपिपासा, कला-सक्ति, आत्मलेखन इत्यादि विशेषांनीं नटलेलें हें काव्य रोमँटिक काव्याचा महाराष्ट्रांतील अवतार असें म्हणावयास कांहींच प्रत्यवाय नाहीं. पण त्यामुळें सर्वांचें काव्य सारखेंच झालें असें नाहीं. तांबे रोमँटिक् कवि खरे, पण त्यांच्यावर टेनिसन्च्या गीतकाव्याचा व ब्राउनिंगच्या नाट्यगीतांचा परिणामच अधिक

झाला होता. चंद्रशेखरांवर मिल्टन्‌ची छाप अधिक वाटते, आणि त्यांचें वळण रोमँटिक म्हणण्यापेक्षां पंडितीच अधिक होतें. कवि गोविंदांवर कोणा इंग्रजी कवीची छाप होती असें म्हणतां येत नाहीं. ते तर ' शृंगाराला दूर सारी ' अशी कविता असावी असें म्हणणारे होते. बालकवि हे आत्यंतिक निसर्गप्रेमी, पण वर्ड्‌स्वर्थ्‌प्रमाणें बोधवादी नव्हते, प्रेमवादी होते. त्यांच्यावरहि इंग्रजी कवीची अशी कोणाचीहि छाप होती असें म्हणतां येणार नाहीं. रेंदाळकर किंवा गोविंदाग्रज यांपैकीं कोणीहि इंग्रजीचें ऋण घेतलेलें दिसत नाहीं; केशवसुतांचें मात्र चेलेपण त्यांनीं स्वीकारलें होतें. माधवानुज किंवा दत्त यांच्यावर इंग्रजी कवितेचे संस्कार कांहीं प्रमाणांत झाले होते हें खरें, पण केवळ इंग्रजीचें भाषांतर असें त्यांच्या कवितेचें स्वरूप केव्हांहि नव्हतें. जुन्या कवींना कोणी नवीन काव्याच्या पुरस्कर्त्यानें भाषांतरे कवि असें म्हणतांच नवीन कवि हे इंग्रजी कवितेचे भाषांतरे आहेत असें उलट उत्तर कांहींनीं दिलें. तथापि हें अल्पांशानेंच खरें आहे. इंग्रजी कवितेचें वळण नवीन कवींनीं स्वीकारलें हें कितीहि खरें असलें, तरी ते केवळ भाषांतरे होते म्हणण्यांत असत्याचाच भाग अधिक आहे.

नवीन काव्याच्या गेल्या साठ वर्षांच्या कालखंडांत दोन खंड पडतात. एक १९२० पर्यंतचा व दुसरा त्या नंतरचा. १९२० पयतचें नवीन काव्य सामान्य स्वरूपाचें भावगीतकाव्य होतें. १८८५–९० पासून १९२० पर्यंत काव्याला नवीन वळण लावण्यांत म्हणजे त्यांत क्रांति करण्यांतच कविप्रतिभेचा व्यय झाला. तोंपर्यंत अर्थात्‌ ती दृढमूल झाली. पण या कालांतील कवींनीं जशी जुळेल वा येईल तशी सर्वच प्रकारची भावगीतरचना केली. नवीन वळण दृढमूल झाल्यावर मग मात्र त्याचा विस्तार व व्यवस्थापन करण्याचें कार्य पुढील कालांतील कवींनीं केलें. भावगीतकाव्याचे विविध प्रकार वेगवेगळे व्यक्त होऊं लागले. या कालांत सुनीत, नाट्यगीत, शिशुगीत, जानपदगीत, विडंबन, राष्ट्रीय काव्य, निसर्गकाव्य, रुबायादि स्फुट काव्य इत्यादि विविध प्रकार स्वतंत्रपणें वावरूं लागले. दीर्घ काव्यांतहि सामाजिक खंडकाव्याचा प्रकार नव्यानें रूढ झाला. अशा प्रकारें क्रांतिकाल आणि व्यवस्थापन–विस्ताराचा काल अशा दोन अवस्थांतून गेल्यावर साहजिकपणें विपरिणमनाची अवस्था येते. तशी अवस्था येऊन

आतां पुन: एकदां काव्यांत क्रांति होऊं लागली आहे व नवकाव्य सुरू झालें आहे असें आज सांगण्यांत येत आहे. पण त्या काव्याचा परिचय 'काव्य-वाहिनी' मध्यें येईल अशी कल्पना नसल्यानें त्याबद्दल येथें विस्तार करण्याचें कारण नाहीं.

आज अर्वाचीन काव्याचें साठ वर्षांचें कालचक्र उलटून गेलें आहे. त्या काव्याचें अवतारकारण किंवा अवतारकार्य हें सफल वा सिद्ध झालें कीं नाहीं हें सांगणें मात्र कठिण आहे. धर्म व समाज यांनीं व्यक्तींवर घातलेलीं बंधनें आज उरलीं नाहींत हें खरें. पण स्वातंत्र्य, समता आणि बंधुता यांच्या प्रतिष्ठापनेचा उद्घोष करीत अवतीर्ण झालेल्या कवितेला हें कार्य सर्वांशानें साधलें आहे असें म्हणवत नाहीं. जाति, समाज आणि धर्म यांवर आधारलेले आपल्या देशांतील विग्रह पाहिले तर कोठें आहे ती बंधुता, असें मनाला वाटतें. समर्थांकडून दुर्बलावर चाललेलें आक्रमण पाहून कोठें आहे ती समता असा विचार मनांत येतो. व्यक्तीच्या हिताच्या नांवावरच सामुदायिकरीत्या जी गुलामगिरी तिजवर लादली जात आहे ती पाहिली कीं कोठें आहे तें स्वातंत्र्य असा प्रश्न पडतो. कदाचित् हें ध्येय काव्यानें आपल्यापुढें सतत ठेवावयाचें, पण तें सर्वदा ध्येयच रहावयाचें असा विधिसंकेत असेल. आजच्या नव काव्याला तरी तें साधेल का याकडे दृष्टि लावून आजचा मराठी रसिक पुढील युगाकडे पाहत आहे.



# अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका





## १. आम्ही कोण ?

आम्ही कोण म्हणून काय पुससी ?–आम्ही असूं लाडके–
देवाचे, दिधलें असे जग तयें आम्हांस खेळावया;
विश्वीं या प्रतिभाबलें विचरतों चोहींकडे लीलया,
दिक्कालांतुनि आरपार अमुची दृष्टी पहाया शके !
सारेही बडिवार येथिल पहा ! आम्हांपुढें ते फिके;
पाणिस्पर्शच आमुचा शकतसे वस्तूप्रती द्यावया—
सौन्दर्यातिशया, अशी वसतसे जादू करांमाजि या;
फोलें पाखडितां तुम्ही, निवडितों तें सत्त्व आम्ही निकें !
शून्यामाजि वसाहती वसविल्या कोणीं सुरांच्या बरें ?
पृथ्वीला सुरलोकसाम्य झटती आणावया कोण ते ?
ते आम्हीच, सुधा कृतींमधुनिया ज्यांच्या सदा पाझरे; !
ते आम्हीच शरण्य, मंगल तुम्हां ज्यांपासुनी लाभतें !
आम्हांला वगळा–गतप्रभ झणीं होतील तारांगणें;
आम्हांला वगळा–विकेल कवडीमोलावरी हें जिणें !

—केशवसुत



## २. सरस्वतीची भूपाळी

नमनें वाहुनि स्तवनें उधळा, जयजयकार करा।
बंधुहो। जयजयकार करा।
सकल मनांचा विकास येतो आज आपुल्या घरा ॥ ध्रु० ।

विमल हास्यसुमवृष्टीमध्यें असो तुझें स्वागत।
निरंतर। असो तुझें स्वागत।
परमात्म्याच्या चित्सौंदर्या, येई बा हांसत १

आत्मवेलिच्या स्फूर्तिफुलांवर वसंत जे विकसती।
बुद्धिचे। वसंत जे विकसती।
त्याच वसंता तादिय विकासा सरस्वती बोलती २

विश्वकाव्य वाचीत बैसली चित्तमयूरावरी।
दीप्ति जी। चित्तमयूरावरी।
त्या दीप्तीला त्या ज्ञप्तीला, वदती वागीश्वरी ३

हे वाग्देवी, असे प्रार्थना ये या संकीर्तना।
उत्सवा। ये या संकीर्तना।
जगन्मंगले सकल मंगलांसह दे पददर्शना ४

सगुण शांत त्वचित्तमूर्तिला गातों मी गायन।
शारदे। गातों मी गायन।
धन्य धन्य सौंदर्य, धन्य त्वप्रसन्न पुण्यानन ५

किरिट शोभला त्वन्मौलीला अमूल्य तत्त्वांचा।
        शारदे। अमूल्य तत्त्वांचा।
अरुण-राग त्यांतून उधळला सद्गुण-रत्नांचा ६

डोले कंठीं सच्छास्त्रांचा चंद्रहार हांसरा।
        पाहुनी। चंद्रहार हांसरा।
भालीं फुलला, गालीं खुलला काव्य दिव्य बिजवरा ७

सौंदर्याहुनि दिव्य दिव्यतर हिचें ज्ञान सुंदर।
        खरोखर। हिचें ज्ञान सुंदर।
त्या ज्ञानाहुन जगांत सुंदर एकच परमेश्वर ८

हृदयमंदिरीं प्राणशक्तिचे झोंपाळे डोलवी।
        देवि ही। झोपाळे डोलवी।
सुखदुःखाचे देउनि झोके जीवांना खेळवी ९

विचारकारंजावर तुषार शब्दांचे नाचवी।
        देवि ही। शब्दांचे नाचवी।
जीवात्मा त्यांतून बोलवी, परमात्मा डोलवी १०

चराचराचा दावि चित्रपट अमुच्या स्मरणावर।
        भराभर। अमुच्या स्मरणावर।
बिजेऐवजीं त्यांत जळे चिच्चंद्राचें झुंबर ११

—गोविंद



## ३. स्फूर्ति

कांठोकांठ भरूं द्या पेला, फेंस भराभर उसळूं द्या !
प्राशन करितां रंग जगाचे क्षणोक्षणीं ते बदलूं द्या !

अमुच्या भाळीं कटकट लिहिली सदैव वटवट करण्याची,
म्हणेल जग आम्हांस मद्यपी, पर्वा कसली मग याची !
जिव्हेचीं बंधनें तर ढिलीं करा तीव्र या पेयानें,
यदुष्णतेनें द्यावापृथ्वी द्रवुनि मिसळती वेगानें !
होउनियां मग दंग मनीं,
व्हावें तें आणा ध्यानीं,
गा मग सुचतिल तीं गाणीं;
परिसुनि त्यांचे शब्द, रूढिचे दास झणीं ते खवळूं द्या !
कांठोकांठ भरूं द्या पेला, फेंस भराभर उसळूं द्या !

सोमाचा रस वेदकाळच्या ऋषिवर्यांनीं उकळीला,
शेष तयाचा द्या तर लौकर पिपासु जे त्या आम्हांला ।
औचित्याच्या फोल विवेका ! जा निघ या दुरवस्थेनें
अम्हां घेरिलें म्हणुनी घेतों झिंगुनिया या पानानें !
कल्पतीची मग करुनी नौका व्योमसागरावरि जाऊं,
उडुरत्नें या गरिब धरेला तेथुनि फेंकुनिया देऊं !
अडवतील जर देव, तरी
झगडूं त्यांच्याशीं निकरीं,
हार न खाऊं रतीभरी !

देवदानवां नरें निर्मिलें हें मत लोकां कळूं द्या !
कांठोकांठ भरूं द्या पेला, फेंस भराभर उसळूं द्या ! २

पद्यपंक्तिची तरफ आमुच्या करीं विधीनें दिली असे,
टेंकुनि ती जनताशीर्षावरि जग उलथुनिया देउं कसें !
बंडाचा तो झेंडा उभवुनि धामधूम जिकडेतिकडे—
उडवुनि देउनि जुलमाचे या करूं पहा तुकडे तुकडे !
'महादेव ! हरहर !' समराचा गर्जत तो वाऱ्यावरती
येउनि घुमतो अमुच्या कर्णीं—"निजती ते ठारचि मरती !"
उठा ! उठा ! बांधा कमरा !
मारा किंवा लढत मरा !
सत्त्वाचा 'उदयोऽस्तु' करा !
छंद फंद उच्छृंखल अमुचे स्तिमित जगाला ढवळूं द्या !
कांठोकांठ भरूं द्या पेला, फेंस भराभर उसळूं द्या ! ३

—केशवसुत



## ४. वेडगाणें

टला–ट,रीला–री
जन म्हणे काव्य करणारी ॥ ध्रु० ॥

आकाशाचीं घरें
त्याला प्रकाशाचीं दारें
ग्रहमाळांच्या वर अडसरी–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

पाचूंच्या वेली
न्हाल्या लावण्याच्या जलीं
दारीं उभ्या स्वर्गीय नरनारी–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

उडुगणांच्या यानीं
बसुन विश्वाची राणी
अनंताची प्रदक्षणा करी–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

चंद्राचें हंसणें
वायूचें बरळणें
सृष्टिसुरांत सुर मी भरीं–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

मी न तुझी–त्याची
मी न माझी–कुणाची !

ब्रह्मांडाच्या घडामोडी करीं–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

दिव्य भोगांच्या खाणी
गाय मनोमय वाणी
कशी वदेल राठ वैखरी–ग,
जन म्हणे काव्य करणारी.

टला–ट, रीला–री
जन म्हणे काव्य करणारी.

—बी



## ५. थकलेल्या भटकणाराचें गाणें

किती रहावें तुजविण आतां ? धीर न मजला क्षण धरवे !
गेलें गेलें वय हें वाया !—मरणाहि तें वाटे बरवें !
काय करावें मज न सुचे,
मुळीं न मजला किमपि रुचे,
हृदयीं सगळें धैर्य खचे;
भणभण वणवण करित अधिक मज आढ्यींहि जागीं नच फिरवे !
किती रहावें तुजविण आतां ! धीर न मजला क्षण धरवे ! १

कितिक योजिले यत्न यावया तुजशीं मीं उत्सुकतेनें !
व्यर्थ जाहले अवघे ! दुर्धर कसें न व्हावें मग जगणें ?
पुष्पांनो ! तर दूर सरा !
कण्टक हो ! मार्गीं पसरा !
प्रकाश नलगे—तिमिर बरा !
सर्व चांगलें व्हावें होतें तुजसाठीं—पण लभ्य नव्हे !
किती रहावें तुजविण आतां ! धीर न मजला क्षण धरवे ! २

शूळ कपाळीं, कंडन हृदयीं, कम्प शरीरीं भरलासे,
सलिल लोचनीं, शीण अवयवीं, हाय ! निराशा मनीं वसे;
तरि माझी ती भेटेल का ?
पांग मनींचा फिटेल का ?
आलिंगू ती झटेल का ?
क्षमा करिल का मला चुक्यांची ?—पुसतों मी माझें बरवें !
किती रहावें तुजविण आतां ! धीर न मजला क्षण धरवे ! ३



—केशवसुत

## ६. बघसी अंत किती राजसे ?

जिकडे तिकडे जगांत सारें प्रेम सांचलें दिसे;
तयाविण कोठें कांहीं नसे.
प्रवाह सारे धांवत जाती नदीकडे अक्षय;
होती तिज भेटुनि अक्षय;
निशिदिनिं रानींवनीं वाहुनी तटिनीही झरझरा,
देती आलिंगन सागरा.
या पुष्पवल्लरी तरुसंगें क्रीडती,
शशिसंगें रमते सदा कौमुदी सती,
अंबरीं समीरण सारे सम्मीलती,
प्रेमावांचुनि निष्फल जीवित ठावें तुजला असे.
बघसी अंत किती राजसे ?

तुंग महीधर गगनश्रीच्या वदनाला चुंबिती;
शशिकर जललहरी कंपिती.
दिनमणि येतां घरीं प्रेमला पूर्वदिशा सुंदरी
फुलते कदंबकुसुमापरी.
हांसत हांसत प्रफुल्लवदनें तारागण खेळती,
अंबरीं परस्परां ओढिती.
रवि येतां उघडी नेत्रातें कमलिनी,
शशि दिसतां हांसे आनंदुनि कुमुदिनी,
वनलक्ष्मी नटते मधु आला पाहुनी,
चंचल चपला, परि मेघाला सोडुनि दूर न वसे;
बघसी अंत किती राजसे ?

शालदुशाला नको, नको मज मंदिलही भरजरी,
त्याहुनी कंथा माझी बरी.
सुरेंद्रनगरी नको, तुजसवें राहिन मी काननीं,
दुजें धन नको मला तुजहुनी,
ओवाळुनि टाकिन तुजवरुनी साठ कोटि अप्सरा !
नको ती विष्णूची इंदिरा !
तुज शोधित फिरलों जनीं, स्मशानीं, वनीं,
तरु वल्ली-विहगां विचारिलें जाउनी,
गिरि-सरिता-उडुगण नाहीं सांगत कुणी,
काय करूं ! तुज पाहूं कोठें ! तुजविण भरलें पिसें;
बघसी अंत किती राजसे ?

झुळझुळ वाहे प्रवाहजल हें एकसारखें जसें,
माझें आयु चाललें तसें.
तुजविण दिसती शून्य दशदिशा ये लवकर धांवुनी
देईं आलिंगन साजणी !
सुमनभूषणें रचुनि परोपरि तनुलतिका मंडिन;
गुंफुनि अलंकार देइन;
नवकाव्यमाळ वेणींत तुझ्या घालिन,
नवरसीं सुरस मिष्टान्न तुला चारिन,
या कविकुंजांतच तुजसंगें राहिन,
सखये कविते ! दर्शन दे, मज तुजविण कोणी नसे;
बघसी अंत किती राजसे ?

शास्त्राभ्यासा करुनी विटलों, विटलों विद्यालया;
        यानें जाइन लवकरि लया.
महापरीक्षा झाली, आली विद्या अथवा कला,
        तरी मी तुजवांचुनि एकला !
प्रेमदृष्टि तूं ठेव मजवरी, मग सारें तत्क्षणीं
        देइन हांकुन हृदयांतुनी !
    ही विद्या साधिल तव पदसंवाहन,
    ही कला करिल तव तनुलतिकामंडन,
    नवकाव्य रचुनि हा दास करिल रंजन,
तव चरणीं सर्वस्व वाहिलें, येउनि घे त्या कसें,
        बघसी अंत किती राजसे ?

—दत्त



## ७. रिकामे मधुघट

मधु मागशि माझ्या सख्या, परी
मधुघटाचि रिकामे पडति घरीं ! ध्रु०

आजवरी कमळाच्या द्रोणी
मधू पाजिला तुला भरोनी,
सेवा ही पूर्वीची स्मरोनी
करिं रोष न सखया, दया करीं.

नैवेद्याची एकच वाटी
अतां दुधाची माझ्या गाठीं;
देवपुजेस्तव ही कोरांटी
बाळगीं अङ्गणीं कशी तरी.

तरुणतरुणिंची सलज्ज कुजबुज,
वृक्षझर्‍यांचें गूढ मधुर गुज,
संसाराचें मर्म हवें तुज,
मधु पिळण्या परि रे बळ न करीं !

ढळला रे ! ढळला दिन सखया !
सन्ध्याछाया भिवविति हृदया,
अता मधूचें नांव कासया ?
लागले नेत्र रे पैलतिरीं.

—भा. रा. तांबे



## ८. कवितारति

अये कविमनोभवे, सहजसंभवे, स्वामिनी,
सुवर्णमयदेहिनी, नवरसात्मके, भामिनी,
प्रसादमयजीविते, अनुविचारसंचारिणी.
चमत्कृतिविलासिनी, रसिकसन्मनोहारिणी १

यदा भगवती गिरा परम मंजु वीणागुणा
स्वयें चलन देउनी करितसे तवाऽवाहना,
यदा मधुर साम तो म्हणति सर्व गंधर्व ते,
मनोहर सुरांगनावलय तें यदा नाचतें, २

अशेष तव वैभवें करुनि वेदपारायणा
यदा स्तवितसे विधी किमपि आदिनारायणा,
यदा स्वरतरंग हे मिळुनि एकमेकांमधीं
प्रसाद बहु पावतो तव अनन्य नादांबुधी, ३

यदाहि कविते ! तुझी परम माधुरी यापरी
उचंबळुनि राहते सकल देवलोकान्तरीं,
तदा त्यजुनि आपुली सहज योगनिद्रा हरी
प्रसन्न नयनीं सुरांवरि सुधाभिषेका करी. ४

अगम्य तनुवाङ्मनाप्रति असे जगन्नायक,
असा निगम गाति ते सुरपुरींतले गायक;
तथापि कविते ! प्रभू वशहि कीर्तनें जाहला,
न कीर्तन तुझ्याविणें, म्हणुनि साध्य तो तूजला ५

तुझी पडुनि मोहनी अवतरेहि साकार तो,
स्वदासजन तारितो, खल अशेष संहारितो;
अये सकळही भयें चळचळां जया कांपती,
करी वश अशा शिवा तुजमुळेंच लंकापती. ६

न मोहबल चालतें लवहि ज्या त्रिमूर्तीवरी,
वशीकरण त्यांजला करिसि तूं जरी यापरी,
तरी मग अम्हां जनांप्रति अनेक मोहाकुलां
तुवां स्ववश केलिया नवल काय ? सांगे मला. ७

प्रसाद घडतां तुझा सहज नाभिमूलांतुनी
अनन्य लहरी उठे, तनुसि टाकि ते व्यापुनी;
तिच्या प्रसरणासवें सकल देह हेलावतो,
क्षणैक चपलौघ कीं जणुं शिरांतुनी धांवतो. ८

मुखामधुनि एकदां गदगदा तदा ये ध्वनी,
स्वयें उचमळोनि ये हृदय, नीर ये लोचनीं;
न काव्यविषयाविना इतर भानही राहतें,
रसात्मक पदावली मग मनोहरा वाहते. ९

करोत करणार ते किमपि जल्पना यावरी,
रसज्ञ कविबंधु तो अनुभवील हें अंतरीं;
परंतु अनुभूति ही मजसि तीन वर्षें नसे,
अहा ! प्रियजनावरी प्रियजनें रुसावें कसें ? १०

तुझ्यास्तव उपेक्षिल्या बहुविधा सुविद्या कला,
तुझ्यास्तव न तीं पदें, उपपदें, मिळालीं मला;
तुझ्यास्तव हुजूरचा जरि गुलाम झालों स्वतां,
तुझ्यास्तवचि गांजलों तरि निबंधनातें अतां. ११

तुझ्यास्तव न लोभतां विभवमार्ग मी टाळले,
तुझ्यास्तव सखे ! मला स्वजन तेहि कंटाळले;
तुझ्यास्तवाचि हेलना मम गृहावधानीं घडे,
तुझ्यास्तव जनाहुनी विजन हा मला आवडे. १२

तुझ्यास्तव तुझ्यापरी मृदुल देहिनी गेहिनी
अनेक समयीं दिली ढकलुनी, अये मोहिनी !
तुझ्यास्तव जुमानिलें नहि सुबंधु नारायणा,
सदा न सदुपासिलें किमपि सूर्यनारायणा. १३

निशा दशदिशांसही गवसणी यदा घालिते,
सुषुप्ति निज मोहनी स्थिरचरावरी टाकिते,
प्रशांत समयीं अशा भ्रमसि जेथ लीलावती,
अतंद्रितचि तेथ हा अनुसरे तुझा सोबती. १४

मुठींत नवतीमिषें कनकवाळुका वाळिली,
परंतु तुजसंगतीं रमुनि तीहि म्यां गाळिली;
अशाहि अहितामुळें मन न भंगलें, रंगलें
सदा तव समागमीं गमलि जंगलें मंगलें. १५

शरीरसुख सोडुनी, विभवपाश ते तोडुनी,
निजाप्तमन मोडुनी, अहित सर्वथा जोडुनी
तुझ्या प्रणयबंधनीं सतत गुंतुनी जो बसे,
रुसोनि कवितासखी ! विमुख त्यास व्हावें कसें ? १६

तुझें स्मरण होतसे मजसि राहुनी राहुनी,
उदास मन जाहलें विरह साहुनी साहुनी;
तुझें श्रवण मी करीं, मनन, घेतला ध्यास ना !
त्वदन्य हृदयेश्वरी ! मम जिवास ना वासना १७

किती दिवस आणखी तळमळूं तुझ्या कारणें ?
वियोगविष पाजुनी उचित का मला मारणें ?
नको, करुं नको असें, सकल संग मी त्यागितों,
प्रसन्न परि हो मला, वर अनन्य हा मागतों. १८

तुझा प्रणयभानु हा प्रखर या क्षणीं जाहला,
मनोघन तयामुळें सरसरां स्त्रवूं लागला,
सतेज रसबिंदु ते हृदयशुक्तिनें झेलले,
जिवा म्हणुनि धीवरें मज दिलीं सुमुक्ताफळें. १९

फिरे कलमवज्र हें वचनमौक्तिकांच्या वरी,
ममायुगुण गोंवुनी बनवितों तयांच्या सरी,
अशा सरस घालितों तुजसि मी सरीच्या सरी,
प्रसाद परि सुंदरी ! मजवरी करीं गे करीं. २०

अहा ! भ्रम-परंतु हा भ्रम अगाध—कां हो मला !
न पूर्व—कवि, तत्कृती, स्मरति कां मला सोज्ज्वला ?
तया कृतिमिषें पहा किति अलंकृतींनीं भलें
सुरम्य कवितावपू नखशिखान्त हें शोभलें. २१

कचांवरि तिच्या पहा कविवरेण्य मुक्तेश्वरें
किती वचनमौक्तिकें रुचिर गुंफिलीं हीं बरें !
भ्रमें—प्रणयसंभ्रमें मणिललाम हा मानुनी
समर्थकृत बोध ती निज शिरास घे बांधुनी. २२

प्रसिद्ध रघुनाथ ह्या रसिक पंडितानें तिला
नवादिरस घोंटुनी तिलक लाल हा लाविला.
सुनील कमलप्रभा, अलिविलास हीं वामनें
दिलीं नयनमंडनें रचुनि कृष्णलीलांजनें. २३

श्रुतींमधुनि घातलीं परमदिव्य देवद्वयें
स्वकाव्य—मणिमंडनें, झळकती किती तीं स्वयें !
नथ प्रथुनि घालितां वचनमौक्तिकें श्रीधरें
किती सरल नासिका विलसते मुखश्री बरें ! २४

स्वकीय परमामृतें—नाहि परंतु—मंद स्मितें
मुकुंद कवि भूषवी विशद कुंदसे दंत ते;
सुवर्णमणि, पोतही मधुनि कृष्णभक्तीमिषें
गळेसरचि बांधिले अढळ एकनाथें कसे ? २५

विराजति गळ्यांत ह्या किति अभंगचंद्रावली
जयांतुनि तुका–यशोधवल चंद्रिका फांकली.
न संतचरितें, महीपति हिला भरी कंकणें
सुवृत्त मणिबंधनीं असुनि कां तयां शंकणें ? २६

अहो, सगनभाउनें, रसिकराज होनाजिनें,
दिली इजसि मंदिली विरल कंचुकी प्रीतिनें.
सुवर्णजंरिचीं बुटें, यमक गोलकल्लोलसे,
मयूर कविचा न हा कृतिकलाप, शालू असे. २७

कटीस कटिबंध ही जडित मेखला आयती,
यतीहि झुलवावया अमृतराय दे काय ती ?
किती श्रुतिमनोहरा रसिक रामजोशी–कृति
कृती न कविते ! तुझीं करिति नूपुरें झंकृती २८

पुरातन अतां कुणी असति ते मराठी कवी,
तदीय रचनांस मी समजतों मुद्या जोडवीं;
अशा कविगणें जिला सजविली स्ववाग्भूषणें,
तिला वचनभूषणें मम नव्हेत, हीं दूषणें ! २९

असोत; जरि दूषणें, तरिहि तीं करीं धारण;
पुराणकविंनीं तुला नटविली असाधारण;
म्हणोनि वरवर्णिनी ! तुजसि दृष्ट लागेल की
न ती वचन–लांछनें मम कदापि होई सखी ! ३०

—चंद्रशेखर



## ८. घट तिचा रिकामा

घट तिचा रिकामा झऱ्यावरी,
त्या चुम्बिति नाचुनि जळलहरी. ध्रु०

अशी कशी ही जादू घडली ?
बघतां बघतां कशी हरपली ?
का समजुनिया राणी अपुली
तिस उचलुनि नेई कुणी परी ? १

मिळत चालल्या तीनी सांजा,
दिवसाचा हा धूसर राजा,
चन्द्रा सोपुनि अपुल्या काजा
घे निरोप कवळुनि जगा करीं. २

पलीकडे त्या करुनि कापणी
बसल्या बाया हुश्श करोनी,
विनोद करिती, रमती हसुनी,
जा पहा तिथें कुणि ही भ्रमरी. ३

तिथें वडाच्या पाळीभवतीं
नवसास्तव मृगनयना जमती;
कुजबुजुनी गुजगोष्टी हसती,
रतिमञ्जिरि हेरा तिथें तरी. ४

तांदुळ पदरीं, बिल्वदळ करीं
चरण क्षाळुनि जवळ तळ्यावरि,
जमति शिवालयिं पोक्त सुन्दरी;
फिरकणी बघा ही त्यांत तरी. ५

पलीकडे वेळूंची जाळी,
तेथें वारा धुडगुस घाली;
शीळ गोड तीमधुनि निघाली,
ही झुळुक हरपली लकिरिपरी. ६

—भा. रा. तांबे



## ९. अगाध कांहींतरी !

अगाध कांहींतरी,
समज हें अजरामर सुंदरी !

व्योमधरेचा चुम्बनविधि हा,
सरे न कल्पान्तरीं !
समज हा अजरामर सुन्दरी !

निसर्ग आणी उषा सुहास्या
निष्कामत्वें करी,
समज हें अजरामर सुन्दरी !

कोठें प्रस्तर ! कुठें कौमुदी !
अन्योन्यीं रति तरी,
समज ही अजरामर सुन्दरी !

रूप निराळें, नाम निराळें,
अभिन्न उभयें परी;
समज हीं अजरामर सुन्दरी !

मीपण, तूंपण अपुलें म्हणजे
प्रिये एकता खरी !
समज ही अजरामर सुन्दरी !

—टिळक



## .१०. बुलबुल

निबिड तिमिर वर नभीं संचरे,
तळीं उष्ण निश्वसती वारे,
सरणांचे भोंवतीं निखारे,
स्थलीं या देख—एकटाच पिंपळ एक.

चिरव्यथित तरुजीव-ज्योती
खिन्न तेज वितरिते सभोंतीं,
जीर्ण विरल तत्पर्णांवरती
दुःखनिर्वाण—उमटवी ठसा निज पूर्ण !

उपेक्षिलेली पहिली प्रीति
रम्योदास तसें एकान्तीं
एकस्थल या रौद्र प्रान्तीं
तरीही आहे—दरवळूनि परिमळ वाहे.

पांडुर मृदु लावण्यद्युतिजल
स्थलपरिसर करि ढाळुनि निर्मळ
जातिलता कुणि एकच केवळ
अदय नियतीनें—लाविली तिथें स्वकरानें.

देह तिचा कृश फिक्कट पांढरा
पाहुनि होई जीव घाबरा,
वाटे सुटतां उडविल वारा
पर्णसंभारा—वर भिरभिर सैरावैरा.

लागो वारा पाउस पाणी,
कुणी धृष्टकर टाको चुरडुनि,
तरि वरि भर ये वोसंडोनी
विकासश्रीला—ती अखंड मंडित बाला.

करुणामय स्वर्ललना कोणी
दिव्याश्रूंचें शिंपुनि पाणी
खचित करी संगोपन जपुनी
असें चित्ताला—वाटतें बघुन वेलीला.

मृदुल धवल नव कुसुमशालिनी
व्रतस्थेस जरि बघतिल नयनीं,
सहजोद्गारें वदतिल रमणी
" अगाइ ग नवल—ही जाई नच येथील!

" वसंत न करी चैत्रार्शिपणें,
" डोलत रविकर न करी येणें,
" झुरे न अंतारें तरिही तेणें,
" अगाइ ग नवल—ही जाइ न या माहित्ररिल.

" साहुनि राहे कडक हिंवाळा,
" कुंजाचा आधार न इजला,
" तरी भोगकल्लोळ सोहळा
" फुलांचा भोगी—ही जाई नवला जोगी!"

आश्चर्य एक कीं कुणि अलबेला
पक्षी पडतां नच दृष्टीला
येई तत्सन्निध रात्रीला
प्रेमघायाळ—भटकोनी रानोमाळ !

चाले त्याचा दीर्घ निशेभर
गूढ भावमय मृदु गीतस्वर,
जणुं निर्जर वीणा-झंकार
कीं बुलबुल बोले—वनराई मोहुनि डोले

हृदयिं खवळला शोकसागर
कंठांतुनि तरि निघती सुस्वर,
येती ऐकुनि होती ते नर
स्वच्छंदी फंदी—नादाच्या ब्रह्मानंदीं !

पक्षी आपण प्रीती केली
भासे त्यांना वायां गेली;
नयनाश्रू ओघळती खालीं
चाखिती धुंद—दुःखाचा परमानंद !

उदास रजनी नच संपावी,
जागरदुःखें हीं सोसावीं,
चित्त तयांचें असेंचि भावी,
विलक्षण भारी—विरुताची जादूगारी

दिशा फांकती-तेज उगवतें—
प्रभात होते-गीत थांबतें —
त्यासरसें तें दृश्य वितळतें
तेजबंबाळीं—रम्याची होते होळी !

उत्कटतेनें हृदय फोडिती
ते स्वैरस्वर रूपा येती;
कोणी म्हणती त्यांत उमटती
स्पष्ट साचार—रमणीचे नामोच्चार !

—बी



## ११. आज तो कुठे जिवाचा चोर ?

आज तो कुठे जिवाचा चोर् ? ध्रु०

वादळ गर्जे, विजा चमकती, आलि घनघटा घोर्. १

रिम् झिम् रिम् झिम् पाऊस पडे, स्मरास आला जोर्. २

उंच गोखड्यामधुनि दिसे या सारें काळें भोर्. ३

लपालें पाखरें, रानिं एकला उंच पुकारी मोर्. ४

तटस्थ पानें, तटस्थ रानें, ये राजा जणुं थोर्. ५

नाक फुगवुनी कान उभारुनि उभें चित्रसें ढोर्. ६

टवकारुनिया पातीं—कणसें कुणास बघति समोर् ? ७

लीन लयीं का तया प्रतीक्षिति, बांधिन काधिं शिरजोर् ? ८

—भा. रा. तांबे



## १२. प्रीति

प्रीति मिळेल का हो बाजारीं ?
प्रीति मिळेल का हो शेजारीं ?
प्रीति मिळेल का हो बागांत ?
प्रीति मिळेल का हो शेतांत ?
प्रीतिची नसे अशि ग मात;
पहा शोधुनी हृदयांत ! १

नंदनवनामधीं आला
कल्पलतेला बहर भला;
तिचीं हृदयिं बीजें पडलीं,
प्रीति त्यांतुनी अवतरली !
प्रीतिची असे अशि ग मात;
पहा आपुल्या हृदयांत ! २

प्रेमळ कृत्यांची माळ
प्रियजनकण्ठीं तू घाल;
द्विगुणित मग तो प्रीति तुला
देइल, न धरीं शंकेला.
प्रीतिचा असा असे ग सौदा
प्रीतिनें प्रीति संपादा ! ३

हृदयीं आलिंगन पाहिलें,
चुम्बन मुखकमलीं वाहिलें,

आणिक रुचतिल ते चार
प्रीतिला होति उपचार !
    प्रीति वाढली, गडे ग, सतत
    पहा तूं प्रियजनहृदयांत !

प्रीति असेल का ग बाजारीं ?
वेडे ! प्रीति मिळेल का ग शेजारीं ? ४

—केशवसुत



## १३. निःशब्द आत्मयज्ञ

कधीं भेटतां एकान्तीं तीं नाहिं कुणा दिसलीं,
कधीं बोलतां परस्परांशीं नाहीं पाहियलीं.

दृष्टादृष्टहि परस्परांची जरी कधीं झाली,
कधीं न लवलें पातें, न कधीं छटा दिसे गालीं.

कधीं निमन्त्रित भोजनास तो घरीं जरी आला
हर्षविषाद न कधीं तिच्या तो शिवला चित्ताला.

गौर मनोरम रूप तयाचें; लाजावें मदनें;
मोहित सारे, परि न बघे ती एकवार नयनें.

तो दीनांचा कनवाळू जैं भरोनिया डोळे
" या विधवांवरि दया करा हो ! " कळवळुनी बोले,

कानोसा घेतांना भासे एक दिवस बसली,
परि पाहुनि मज शान्तपणें ती निघोनिया गेली.

कम्पित हस्तें लेख लिहित ती नाहीं कधिं दिसली,
वेळिं अवेळीं वळचणींतुनी नाहिं पुडी पडली.

तरी सकाळीं एक दिवस मज तिच्या अङ्गुलीला,
डाग दिसे शाईचा; कागद तुकडे झालेला.

त्याच अङ्गुलीवरी परि दिसे फोडहि आलेला,
कधीं पोळलें बोट कशानें ठाउक देवाला !

अंथरुणावरि कधिं रात्रीं नच दिसली बसलेली,
तरी कधिंकधीं उशी तियेची दिसली भिजलेली.

कोन्दण हरपे, दीन हिरकणी कोपऱ्यांत लोळे,
असें वाटलें मज दगडा कधिं बघुनि तिचे डोळे.

ती चन्द्राची कोर, जिला हो लाजावें रतिनें,
कळाहीन लागली दिसाया हाय काळगतिनें !

हळूहळू ती गळूं लागली, गाल खोल गेले;
ज्वरें जीर्ण त्या कोमल हृदयीं ठाणें बसवीलें.

किती वेळ तो समाचारही घ्यायाला आला,
नयनीं त्याच्या काळजिचा कधिं भास मला झाला.

डाक्तर झाले, हकीम झाले, वैद्यहि ते झाले;
निदान होय न कुणा, कुणाची मात्रा नच चाले.

“दीन दयाळा मरणा, सोडिव !” जपोनि जप हाय !
कारुण्याची मूर्ति मावळे, थिजला तो काय !

अकस्मात त्या क्षणापासुनी अदृश्य तो झाला !
कोठें गेला, काय जाहलें, ठाउक देवाला !

—भा. रा. तांबे



## १४. कुणास्तव कुणीतरी

सरोष घन वर्षती, तरुलतांशि वारा झुजे,
विराम नच ठाउका क्षणहि नाचतांना विजे;
भयानकाचि संचरे, सकल सृष्टि हो घाबरी;
कुणास्तव कुणीतरी सभय वाट पाहे घरीं !

स्वप्रतिरवामुळें बधिर जीव सारे जरी,
निनाद करिते अहा ! श्रवण चाहुलीचा तरी;
उठे दचकुनी तडित् दुसरि नर्तनाला करी,
कुणास्तव कुणीतरी कितिक येरझारा करी !

खुशाल कर वृष्टिला, तुज न तो भिणारा घना !
पिशाचसम तूं खुशाल कर गे विजे ! नर्तना.
महीधर समीरणा ! धरुनि लोळवी भूवरी,
कुणास्तव कुणीतरी निघत जावयाला घरीं !

घनप्रसर माजला, नभिं न एक तारा दिसे,
परंतु हंसरा सदा सुखद चंद्र गेहीं वसे;
अहा द्रववितां कुणा सहज चंद्रकान्ताप्रती
कुणास बघुनी कुणीतरि हंसेल हर्षें किती !

अहा चरणधावना कलशपूर्ण उष्णोदकें,
रुचिप्रद वरान्न जें करिल हो सुधेला फिकें !
फुलांहुनि मऊ असें शयन रम्य मंचावरी,
कुणास्तव कुणीतरी घरिं अशी तयारी करी.

रसाळ वचनावली विविध तोंडिं लावावया
मिळेल, उपमा उरे मग न भोजनाला तया;
पडेल मग विस्मृती सकलही श्रमांची क्षणीं,
कुणाप्रति कुणींतरी निरखितां प्रसन्नेक्षणीं !

तया प्रणयनिर्झरा प्रणयानिर्झरीला तिला
सदा सुखद भोंवरा विहरण्यास ऐशा मुला
बळेंच उठवी कुणी ! उभयतांस आलिंगुनी
कुणीतरि धरील तैं विषय अन्य कैंचा मनीं ?

तमास अपसारुनी उन पडेल त्या मंदिरीं,
तशांत पडतील हो मधुनि पावसाच्या सरी,
कुणीतरि धरोनियां कर करीं कुणाचा तरी,
स्तवील परमेश्वरा जलद, सूर्य ज्याच्या करीं !

—टिळक



## १६. प्रीति निमाली तर !

नादें मंजुल आपल्या रिझविते जी मन्मना नेहमीं,
ती एका निमिषांत रम्य मुरली भंगून टाकीन मी.
अंगातें जडवून पंख उसने जाईन कीं सत्वर—
मी येथून उडून उंच गगनीं—प्रीति निमाली तर ! १

माझी कोण करील उत्सुक मनें मार्गप्रतीक्षा घरीं ?
प्रेमें बालक कोण सुंदर वदा देईल माझ्या करीं ?
आतां भासतसे मला भवन जें सर्वस्व चेतोहर
त्या येईल खरोखरीच वनता—प्रीती निमाली तर ! २

काव्याला अनुरूपसा विषय तो कोठून राहे जनीं ?
स्फूर्तींच्या उठतील नित्य लहरी कैशा कवीच्या मनीं ?
वाहावीं कवणास काव्यसुमनें त्यानें वदा भूवर ?
कोठूनी जगतीं उरे रसिकता ? प्रीती निमाली तर ! ३

अस्ता जाइल सूर्यतेज वितरी विश्वास जें जीवन,
तेणें व्याप्त समस्त होइल जगत् दुःखांधकारें घन;
सौख्याचा लवलेशही न मनुजा लाभेल हो दुर्धर,
भीतीनें मरतील मानवकुलें—प्रीती निमाली तर ! ४

—विनायक



## .१७. दृष्ट हिला लागली !

दृष्ट हिला लागली, पडे कुणि पाप्याची साउली ! ध्रु०

लिम्बलोण ग कोणी उतरा,
जगदम्बेचा ग अङ्गारा
लावा, बांधा गण्डादोरा,
काळजि घ्या चांगली ! १

चाफ्यापरि गोरेपण पिवळं,
काकडीपरी अंग कोवळं,
मैद्यापरि लुसलुशीत सगळं,
—दृष्ट पडुनि करपली ! २

ज्यांच्या पोटीं उदंड माया
लेकुरवाळ्या आयाबाया,
पोक्त शहाण्या आणा दाया,
दावा चाफेकळी. ३

चिमणिसारखं तोंड जाहलं,
डोळ्यावरचं तेज चाललं,
नाक उंच वर येउं लागलं,
गत कशि ग जाहली ! ४

विशाळ डोळे लावुनि वरती
चित्रें पाही जाशि काकुळती,
मधेंच दचकुनि कान देइ ती,
पोर बाइ बहकली ! ५

करकरीत तीनी सांजा ही
देवदर्शना एकलि जाई,
वाऱ्यापरि ही अचपळ बाई
दुष्टें कुणि पाहिली ! ६

गरिब भोळसर आयाबाया,
खऱ्या दृष्टिची वार्ताहि न यां !
अनुभव घेउनि सारें वाया !
माया खरि आंधळी ! ७

—भा. रा. तांबे



## .१८. वियुक्ताचा उद्गार

राहे नित्य वसुंधरेस धरुनी हा भाग्यशाली गिरी,
    यालागीं दयिताविवियोग न कधीं माझ्यापरी जाचितो,
    वेलेला लहरीकरीं निरवधी हा अब्धि आलिंगितो,
कान्तेपासुनि मी परी विचरतों या दूरदेशान्तरीं !

चित्रोल्लास चिर प्रकाश सुभगच्छायासखीशीं करी,
    त्यांच संगमसौख्य पाहुनि मनीं मी फार वेडावतों;
    पोटाशीं धरुनी सदा सुरधुनी आकाश हा नांदतो,
त्याचा मत्सर उग्र दंश करितो वेगें मदभ्यन्तरीं !

तेणें व्याकुल होउनी झडकरी मी झांकितों लोचनें;
    माया–ईश्वर, पूरुष–प्रकृतिही, वागर्थ, ऐशीं द्वयें–
सम्यग्युक्त बघून आंत, उघडीं त्रासून मी ईक्षणें,
    तों नित्य द्युतिदेवतेसह रमे तो दृक्पथीं सूर्य ये !

त्यायोगें विरहाग्नि फार भडके !–होतें नकोसें जिणें;
    आतां हाय ! न राहवें तुजविणें, कैसें करूं गे सये !

—केशवसुत



## १९. कुणि कोडें माझें उकलिल का

कुणि कोडें माझें उकलिल का?
कुणि शास्त्री रहस्य कळविल का? ध्रु०

हृदायें तुझ्या सखि, दीप पाजळे,
प्रभा मुखावरि माझ्या उजळे;
नव रत्नें तूं तुज भूषविलें,
मन्मन खुललें आंतिल कां? १

गुलाब माझ्या हृदयीं फुलला,
रंग तुझ्या गालांवर खुलला;
काटा माझ्या पायीं रुतला,
शूल तुझ्या उरिं कोमल कां! २

माझ्या शिरिं ढग निळा डवरला,
तुझ्या नयनिं पाउस खळखळला;
शरच्चन्द्र या हृदायें उगवला,
प्रभा तुझ्या उरिं शीतल कां? ३

मद्याचा मी प्यालों प्याला,
प्रिये, तयाचा मद तुज आला;
कुणी जखडिलें दोन जिवांला
मन्त्रबन्धनीं केवळ! कां! ४

—भा. रा. तांबे



## २०. जोहार

विलासिनी रमणीसह सुमनाच्या शय्येवर पहुडला ! ध्रु०

हृदयाशीं हृदय मिळे । अधराशीं अधर जुळे
करपाशीं कंठ दिले—भिन्नभाव लोपला. १

स्वप्नसुखीं चित्त दंग । स्वैर करी रंग रंग
सर्व परी होय भंग—दुंदुभिरव ऐकिला. २

निद्रा निमिषीं उतरे । जागृति देहांत शिरे
ललनेपासून त्वरें—दूर वीर जाहला. ३

घेउन तलवार बळी । गेला शेजेजवळीं
प्रेमाची ती पुतळी—भंगाया सज्जला. ४

बघतां ती मूर्ति परी । धडकी भरली तदुरीं
धैर्य गळे; कंपभरीं—खड्ग पडे भूतला. ५

एक चित्त जाय रणीं । एक न सोडी रमणी
एका प्रिय कीर्ति जनीं—एका स्त्री प्रेमला. ६

एकच घेईन मुका । केला निर्धार निका
दशशत घेऊन मुका—तो मुकाच राहिला. ७

आंवरून मोह धरी । घेई खड्गास करीं
जागृत ललनेस करी—भाव तिला समजला. ८

धैर्यदेवता नवरी । उठे, मनीं भय न धरी,
पतीपुढें मान करी—सिद्ध उभी मृत्युला. ९

खड्गाचा हात फिरे । पडला मृत देह धरे
पतिवधित स्त्रीरुधिरें-भूमिभाग रंगला. १०

सौख्यशांतिसमाधान-। विषयविलासस्थान
होय तें क्षणीं श्मशान-अंधकार पसरला. ११

प्रेमाच्या हेतुविणें । शून्य दिशा, शून्य मनें
भारभूत होय जिणें-मृत्यु प्रिय एकला. १२

मरणाला जो तयार । तोच अरी करिल ठार
रणदेवी विजयहार-घाली त्याच्या गळां. १३

यास्तव रजपूतकुळीं । देती स्त्रीतनय बळी
धन्य तेच भूमितळीं-पाश जयीं तोडिला. १४

—विनायक



## २१. नववधू प्रिया, मी

नववधू प्रिया, मी बावरतें;
लाजतें, पुढें सरतें, फिरतें. ध्रु०

कळे मला तूं प्राणसखा जरि,
कळे तूंच आधार सुखा जरि,
तुजवांचुनि संसार फुका जरि,
मन जवळ यावया गांगरतें ! १

मला येथला लागला लळा,
सासरिं निघतां दाटला गळा,
बागबगीचा, येथला मळा
सोडितां कसें मन चरचरतें ! २

जीव मनींच्या मनीं तळमळे,
वाटे बन्धन करुनि मोकळें
पळत निघावें तुजजवळ पळें—
परि काय करूं ? उरिं भरभरतें ! ३

चित्र तुझें घेऊनि उरावरि
हारतुरे घालितें परोपरि,
छायेवरि संतोष खुळी करिं,
तूं बोलवितां परि थरथरतें. ४

अता तूंच भयलाज हरी रे !
धीर देउनी ने नवरी रे :
भरोत भरतिल नेत्र जरी रे !
कळ पळभर मात्र ! खरें घर तें ! ६

—भा. रा. तांबे



## .२२. मयूरासन आणि ताजमहाल

### श्लोक

कामें दोन सुरेख त्या नृपवरें केलीं:—मयूरासनीं
  ज्या तो बैसुनि शोभला प्रथम तें, सा कोटि ज्या लागले,
  राजे ज्यापुढते जुळूनि अपुल्या हस्तद्वया वांकले,
झाले कंपित, तत्करीं शिर असे, येऊनियां हें मनीं,

प्रेमें मन्दिरही तसें निजसखीसाठीं तयें लावुनी
  कोटी तीनच त्या गंभीर यमुनातीरावरी बांधिलें !
  चोरें आसन तें दुरी पळविलें ! स्मर्तव्य कीं जाहलें,
आहे अद्‌भुत तो महाल अजुनी तेथें उभा राहुनी !

विल्हेवाट अशीच रे तव कृती त्या सर्वदा पावती;
  मत्त भ्रान्त नरा ! सदैव कितिही तूं धूप रे जाळिला—
स्वार्थाच्या प्रकृतीपुढें—निजमनीं ही याद तूं जागती
  राहूं दे—तरि धूर होइल जगीं केव्हांच तो लोपला !
काडी एकच गंधयुक्त नमुनी प्रीतीस तूं लाव ती,
  तीचा वास सदा जगीं पसरुनी देईल तो तुष्टिला !

—केशवसुत.



## २३. राजकन्या आणि तिची दासी

“ प्रेम तयावर होतं तर मग तुमचं ना भारी ? ”
“ छे छे ! कसलं ? लेक नृपाची मी, तो व्यापारी ! ”
“ कुंवरजीस दावितां जवाहिर तो, तुम्हि त्यावरतीं
दृष्टि रोखिली स्नेहें वरचेवर हळुं कां तर ती ? ”
“ छे छे ! भलतं ! खुळे, तयावर का रत्नावर ग ? ”
“ खुळीच मी, मज कशी कळावी मनांतलीं बिंगं ?
बोलुं लागतां कान दिला जरि चपापलां स्वान्तीं,
डोळ्यावरुनी गालीं कितिदा क्षणीं क्षळके कान्ती ! ”
“ कळेच ना मज, तुझ्याच मनिंचे हे सारे चाळे ! ”
“ खुळीस का मज शक्य नृपाच्या लेकिस जें जाळे ?
तुम्हांस दावावया जवाहिर येतां कां त्याला
जा जा ! वदलां मुखें, न नयनें ? लालि खुले गालां ?
कां ओशाळ्या झालां ? लज्जित जणुं कवणा झालां ?
का पाण्याला रत्नाच्या का डोळ्यांच्या बोला. ”
“ कधिं ग लाजलें ? कधीं पाहिलं मीं तेव्हा खालीं ?
नको जवाहिर म्हणुनि म्हणालें. जा ! कसली लाली ? ”
“ काय अताशा झालं तर मग तुमच्या जीवाला ?
कोमेजूं का गाल लागले ?– तो येथुनि गेला !
उगिच बसोनी कां वाऱ्याला कान कधीं देतां ?
उगिच कुणाचा भास होउनी किति फुगतां फुलतां ?
हात ठेवुनी दारावर किति वेळ उभ्या असतां ?
जणुं उघडिल कुणि दार ! गवाक्षीं कां ढुंकित बसतां ? ”

" कधिं ग दिला कुणि कान ? कुणाला कधिं ग भास झाला ?"
" कळेल कैसं देउनि चुकतां हृदयाचि दुसऱ्याला ? "
" घे घे सटवे, आळ घेशि तर भलता मजवरतीं।
जा म्हण, बसलं मन त्यांवर, चल, निघ येथुनि परती ! "
" कंवराणीजी, कां रागवतां ? ही लोचट दासी—
क्षीण अवयवीं किति तरि खुलते छबि ही आतांशीं !
संचरलं तें वारं, स्मर कीं काय म्हणति ज्याला,
बहार उसळे किती चहुंकडे शरीरवेलीला !
खैरपूरच्या गुणत्रयरूपें योग्य कुमाराला
राणाजी ते देतां म्हणतां ' ना ' कां मग त्याला ? "
" खैरपूर किति धनाढ्य ! त्यांना योग्य अम्ही का ग ? "
" कंवराणीजी, किती लपवितां मन ? किति हीं सोंगं ?
किति भोळ्या तुम्हि ! खैरपुरेशाचे ते, न व्यापारी,
वेष पालटुनि आले इकडिल बघण्या ही स्वारी. "
" काय पुन्हा ते खैर–तेच–व्या–का–कूवरजी ते ? "
" मी खोटी, मी सटवी लुच्ची ? उर कां धडधडतें ? "

—भा. रा. तांबे.



## .२४. पन्नास वर्षांनंतर

तूं हुबेहूब साउली त्याच मूर्तिची—
हरपली दिवंगत झाली जी मूर्ति साउली तिची. १

भटकतां विदेशीं दीन हीन जी मुली !
कधिकधीं मनोमय ऐशा स्वप्नभूमध्यें भेटली. २

संपला दिवस, गे अता सांज जाहली;
कधि घोर रात्र ये ऐशी हुरहूर जया लागली, ३

त्याचिया उषेचें चित्र, तया दाविशी !
का जन्मभरी रचिली गे ती घडी अंतिं मोडिशी ? ४

तें विकसित कमलापरी बिंब, ती प्रभा—
सौवर्ण शरांसम हा हा ! ते किरण झोंबती नभा; ५

तें हरित पल्लवांतील मंजु कूजन,
उघडणें नयन वेलींचे, तें त्यांचें आंदोलन !— ६

आवरीं, आवरीं मुली ! जाइं निर्दये !
जाईल जीव हा माझा पाहतां चित्र तें बये ! ७

लाविलें दार जखडोनि, कुलुप घातलें;
तें वाद्य उघडुनी हा हा ! कळ फिरवूं मन धावलें. ८

गत सूर ऐकतां भान न उरलें, मुली,
जा ! पुरे करी तव माया, हा हाय हद्द जाहली ! ९

चळ भरला म्हणशिल मला, खरें तें मुली,
विसरूनि मला मी गेलों   पाहूनि तुला या स्थळीं. १०

बालार्क-किरण हे तुला न्हाउं घालिती,
या संध्याभेसुर छाया   चहुंकडे मला घेरिती. ११

चढणीवर पाउल तुझें, उतरणीवरी
भरभरा पाउलें माझीं   पडतात सावरीं तरी. १२

तुज मंडोळ्या प्रीतिच्या शोभती, परी
वाकलों मृताशाभारें   वाहुनि त्या पाठीवरी. १३

यापरी कोण तूं, कोण मीहि आठवें;
जें मेलें गेलें त्याचें   भूत गे कशाला हवें ? १४

जा ! जाइं इथोनी, सुखें मरूं दे मला,
या लीला त्यास्तव राखीं   जो प्रीतिमदें झिंगला. १५

परि दया करी त्यावरी जया भेदिशी;
नच हत्या करिं कवणाची,   बघ दशा होय मम कशी ! १६

तूं नात जिची गे पणतू होउत तिला !
रडणार कोण मजसाठीं ?   नशिबास नर्क ठेविला ! १७

—भा. रा. तांबे



## .२५. एक अमेरिकन मुलगी

पाठीवरी रुळति धूसर मुक्त बाल,
जैसे गुलाब फुलले दिसतात गाल;
विस्तीर्ण हें निढळ पानच केवड्याचें,
जेथें सुभाग्य, मतिमत्त्व खुशाल नाचे.

या केवड्यावर अली बसले मधून,
तैसेच हे कुरळ शोभति दोनतीन;
या रम्य वक्र भिवया म्हणतात ‘ येथें—
थारा नसे कृपण दीन मनोरथातें ! ’

साधें प्रसन्न मधु बाल्य करी विहार
नेत्रांत जें करि तयांप्रति लोल फार;
रत्ना ! तुझें हरपलें जणुं सर्व पाणी
ही रम्य दीर्घ नयनें गमतें बघोनी !

हें वेत्र सुंदर दिसे मज चारुतेचें,
सारल्य अग्रनतिमान अपूर्व ज्याचें;
सोत्कंठ नासिक हिचें म्हणतें जगाला
आर्यान्वयोद्भव खरोखर रम्य बाला !

किंचित् प्रभातसमयीं काळिनें फुलावें
कीं अंतरंग लपवून पुढें करावें,
हें हांसरें मुख हिचें करि तीच लीला
दावी पुन्हां लपविते रदनावलीला.

आरक्त ओष्ठ जणुं वेलच पोंवळ्यांचे
तेही गमे विरमतील पुढें तयांचे;
किंचित् विभक्त दिसती, जणुं सांगताती
निश्चिंत निर्मल सुखी किति बाल्यवृत्ति !

वाटे उषाच हंसते फिरते जगांत !
कीं स्फूर्ति हीच कविची मधुरूप घेत !
अव्याजता रसिकता जणुं मूल झाली
स्वर्गांतुनी सहज भूवर आज आली.

—टिळक



## २६. माझी कन्या

गाइ पाण्यावर काय म्हणुनि आल्या ?
का ग गंगायमुनाहि या मिळाल्या ?
उभय पितरांच्या चित्त-चोरटीला
कोण माझ्या बोललें गोरटीला ?

उष्ण वारे वाहती नासिकांत,
गुलाबांला सुकविती काश्मिरांत,
नंदनांतिल हलविती वल्लरींला,
कोण माझ्या बोललें छबेलीला ?

शुभ्र नक्षत्रें चंद्र चांदण्याची
दूड रचलेली चिमुकली मण्यांची
गडे ! भूईवर पडे गडबडून,
का ग आला उत्पात हा घडून ?

विभा-विमला आपटे-प्रधानांच्या
अन्य कन्या श्रीमान कुलीनांच्या
गौर चैत्रींची तशा सजुनि येती,
रेशमाचीं पोलकीं छिटें लेती.

तुला ' लंकेच्या पार्वती ' समान
पाहुनीया, होवोनि साभिमान
काय त्यांतिल बोलली एक कोण
' अहा !-आली ही पहा-भिकारीण !'

मुली असती शाळेंतल्या चटोर;
एकमेकींला बोलती कठोर;
काय बाई ! चित्तांत धरायाचे
शहाण्यानें ते शब्द वेडप्यांचे ?

रत्न सोनें मातींत जन्म घेतें,
राजराजेश्वर निज शिरीं धरी तें;
कमल होतें पंकांत, तरी येते
वसंतश्री सत्कार करायातें.

पंकसंपर्कें कमल का भिकारी ?
धूलिसंगें गे रत्न का भिकारी ?
सूत्रसंगें सुमहार का भिकारी ?
कशी तूंही मग मजमुळें भिकारी !

बालसरिता-विधु-वल्लरीसमान
नशीबाची चढतीच तव कमान;
नारिरत्नें नरवीर असामान्य
याच येती उदयास मुलांतून.

भेट गंगायमुनांस होय जेथें,
सरस्वतिही असणार सहज तेथें;
रूपसद्गुणसंगमीं तुझ्या तैसें,
भाग्य निश्चित असणार तें अपैसें.

नेत्रगोलांतुन बालकिरण येती,
नाच तेजाचा तव मुखीं करीती;

पाच-माणिक आणखी हिरा-मोतीं
गडे ! नेत्रां तव लव न तुळों येती.

लाट उसळोनी जळीं खळें व्हावें,
त्यांत चंद्राचें चांदणें पडावें;
तसें गालीं हांसतां तुझ्या व्हावें,
उचंबळुनी लावण्य वर वहावें !

गौरकृष्णादिक वर्ण आणि त्यांच्या
छटा पातळ कोंवळया सम वयांच्या
सवें घेउनि तनुवरी अद्भुताचा
खेळ चाले लघु रंगदेवतेचा !

काय येथें भूषणें भूषवावें,
विविध वसनें वा अधिक शोभवावें ?
दानसीमा हो जेथ निसर्गाची,
काय महती त्या स्थलीं कृत्रिमाची !

खरें सारें ! पण मूळ महामाया
आदिपुरुषाची कामरूप जाया
पहा नवलाई तिच्या आवडीची
सृष्टिशृंगारें नित्य नटायाची.

त्याच हौसेंतून जगद्रूप लेणें
प्राप्त झालें जीवांस थोर पुण्यें;
विश्वभूषण सौंदर्य-लालसा ही
असे मूळांतचि, आज नवी नाहीं !

नारि मायेचें रूप हें प्रसिद्ध,
सोस लेण्यांचा त्यांस जन्मसिद्ध;
तोच बीजांकुर धरी तुझा हेतू,
विलासाची होशील मोगरी तूं !

तपःसिद्धीचा ‘ समय ’ तपस्व्याचा,
‘ भोग ’ भाग्याचा कुणा सभाग्याचा;
पुण्यवंताचा ‘ स्वर्ग ’ कीं कुणाचा,
‘ मुकुट ’ कीर्तीचा कुण्या गुणिजनाचा.

‘ यशःश्री ’ वा ही कुणा महात्म्याची,
‘ धार ’ कोण्या रणधीर कट्यारीची;
दिवसमासें घडवीतसे विधाता
तुला पाहुन वाटतें असें चित्ता !

तुला घेइन पोलकें मखमलीचें,
कुडीं मोत्यांचीं, फूल सुवर्णाचें;
हौस बाई ! पुरवीन तुझी सारी,
परी आवरिं हा प्रलय महाभारी !

ढगें मळकट झांकोनि चंद्रिकेला
तिच्या केलें उद्विग्न चांदण्याला;
हास्यलहरींनीं फोडुनी कपाट
प्रकाशाचे वाहवीं शुद्ध पाट !

प्राण ज्यांचेवर गुंतले सदाचे,
कोड किंचित् पुरवितां न ये त्यांचें;

तदा बापाचें हृदय कसें होतें,
न ये वदतां, अनुभवी जाणती तें !

माज धनिकाचा पडे फिका साचा,
असा माझा अभिमान गरीबाचा.
प्राप्त होतां परि हे असे प्रसंग
हृदय होतें हदरोनियां दुभंग !

देव देतो सद्गुणी बालकांना
काय म्हणुनी आह्मांस करंट्यांना ?
लांब त्याच्या गांवास जाउयीयां
गूढ घेतों हें त्यास पुसोनीयां !

" गांवि जातों, " ऐकतां त्याच काळीं
पार बदलुनि ती बालसृष्टि गेली !
गळां घालुनि करपाश रेशमाचा
वदे " येतें मी " पोर अज्ञवाचा !

—बी



## २७. सुशीला

सुशीलेचें परि बाल्य सरत आलें,
स्वप्न पुढचें तें तिनें पाहियेलें !
यौवनाच्या देहलीवरी राहे
उभी कन्या, आंत हो काय पाहे !

किती किल्ले ती नवे नवे बांधी
किती कार्यें कल्पनाबळें साधी !
कंठिं बाल्याच्या ठेवुनियां हात
फिरे रमणी तारुण्यकाननांत !

क्षणें प्रौढ, पुन्हां क्षणें बाळ व्हावें,
ज्ञान सांगावें, क्षणानें रुसावें;
क्षणें बाळांतुन दूर निघुनि जावें,
क्षणें त्यांसह नर्तना सिद्ध व्हावें !

बाल्य आणी तारुण्य यांजमध्यें
परमसौख्याची स्थिती तिला लाधे;
अभिमताशीं परि पूर्वपरिचिताशीं
अधिक लग्ना ती दिसे शैशवाशीं.

अर्ध सौरभ, सौंदर्य हृदीं राहे,
अर्ध केवळ बाहेर दिसत आहे;
अर्ध पुष्पपणा पावली कळी ती
बाल्यसीमेवर हंसत डुलत होती !

—टिळक



## .२८. जिऊ आणि शिवबा

तीं एकजीव दोघें असुनि असे त्यांस दूसरा जीव,
कन्या ‘ जिऊ ’ म्हणोनी; तत्प्रेमालय रसाल राजीव !
गोधूमवर्ण तीचा हरणाच्या पाडसापरी डोळे.
स्नेहाळ वदन नामी, प्रसन्न विधुबिंब जेविं वाटोळें.
तो केशपाश काळा, भाळावरि लांब आडवें कुंकू;
जणुं म्हणति शब्द तीचे आम्ही कोकिलरवासही जिंकूं.
घेती पाटिल साड्या हौसेच्या रेशमी किनारीच्या,
ऐनेदार खडीच्या झळकति चोळ्या तया कुमारीच्या,
साधींच कंकणें तीं, कदा तदाकार नागमोडीचे,
शोभति शुद्ध रुप्याचे तयांवरी गोल गोठ जोडीचे.
जाई आईसंगें मळ्यांत किंवा खळ्यांत ही कन्या,
साधी निसर्गसुंदर दिसे तदा देवता जणों वन्या.
ऐशा जिऊस आले बहु कर्षक मागणीस घालाया,
परि पाटील धजेना त्यांतिल एकासही तिला द्याया.
थोर घरंदाजाला, तरुणाला सुगुण रूपवंताला
द्यावी निज कन्या ही उत्कंठा कोणत्या न ताताला ?
त्या चिंवट मोहजालीं पाटिलबावाहि गुंतले गेले,
त्याहीं पुष्कळ न्याही आले तैसेच पावते केले.
तंव यौवनें हळूहळु ठेवियलें त्या जिऊंत पाऊल;
मायेमुळें धनाजी त्याची ऐकूं शके न चाहूल.
ग्रामस्थ तरुण कर्षक, उपनांवें म्हणत ज्यास ‘ घायाळ, ’
त्यास जिऊनें केलें अपांगबाणें क्षणांत घायाळ !

प्रथम विकाराची ती प्रथमचि ये त्याचिया मना भरती;
थरथर कांपूं लागे, आले रोमांचही वपूवरतीं.
रसना शुष्क जहाली, शब्द निघेना मुखांतुनी नीट;
लागे हृदय उडाया, घाबरला तो असूनही धीट.
विसरोनि भान सारें ध्यान जिऊचेंच लागलें त्याला;
त्याला दोष कशाला द्यावा ! आधीं अहो, विधात्याला.
ती विषमता भवाची संतत ठेवी विजोड जोडून,
तोडुन सजोड, टाकी तन्मृदु हृदयेंहि तोच फोडून.
त्याच्याच योजनेनें पाटिल नेई मळ्यांत मदतीला
शिवबा घायाळाला, तो निरखी तैं जिऊस सुदतीला.
दर्शन, सहवास, पुढें भाषण, अनुनय तयांमध्यें चाले;
प्रेमाचें परिपोषण अशा क्रमें परिचयासत्रें झालें.
ती पाडाचे आंबे मिळतां शिवबास आदरें देई,
ताजा सुरस उसाचा शिवबा आधीं जिऊकडे नेई.
एके दिनीं सकाळीं शेतांतिल लोक पांगले गेले,
हें पाहुनि शिवबांनीं प्रेमाचें मागणें तिला केलें.
किन्नरमिथुनासम तीं द्राक्षाच्या रम्य मंडपाखालीं,
कांहीं गुंजन करितां अदृश्य तेथेंच दृष्टिला झालीं.
एका क्षणप्रभावें बनलीं अन्योन्यमित्र जिवलग तीं,
लगबगती भेटाया, भेट न होतां मनांत तगमगती.
भारोनि टाकिलीं जणुं, जादूच्या पूर्णसिद्ध मंत्रानें;
वागति भिन्न जनामधिं तथापि विजनांत एक तंत्रानें.

—चंद्रशेखर



# .२९. वेषभूषा

राचिसि वेषभूषा ! अथवा कुसुमचापपाशा ध्रु०

सुटले काळे केश मोकळे, तैलाबिंदु त्यांवरतीं,
विंचरिशी मग हास्तिदंतमय कंकत घेउनि हातीं.
रचिसि केशभूषा ? अथवा कुसुमचापपाशा ? १

कुरळ कुंतलां स्वैरबालकांपरि आवरुनी ठायीं,
उन्नतिमार्गें हळुहळु रिझवुनि नेतां श्रम तुज होई.
रचिसि मौलिभूषा ? अथवा कुसुमचापपाशा ? २

पेड पिळांचा वळुनि बांधितां ऐटदार वाटोळा,
शिवपिंडीतें वाटे वेढी सर्पराज जणुं काळा !
रचिसि वेणिभूषा ? अथवा कुसुमचापपाशा ? ३

अर्धोन्मीलित कुंदकळ्यांचा गजरा घालिसि वरतीं,
गमतें गिरिशिरिं गंगामंडळ धरि रवि-किरणें कांती.
रचसि पुष्पभूषा ? अथवा कुसुमचापपाशा ? ४

स्थिर तर्जनिनें सुरम्य कुंकुमतिलक लावितां भालीं,
रक्तगोल जणुं प्रभातरविचा प्रकटे प्राचीमूळीं !
रचिसि भालभूषा ! अथवा कुसुमचापपाशा ? ५

रत्नमुद्रिकामंडित अंगुलि ईची करुनि शलाका,
विशाल निर्मळ नयनसंपुटीं काढिसि कज्जलरेखा.
रचिसि नेत्रभूषा ! अथवा कुसुमचापपाशा ? ६

भूषाभूषित देहयष्टि मग बघसी जयिं आदर्शी,
प्रतिबिंबातें बिंब तेंवि मम मन तव मन आकर्षी,
रचिसि वेषभूषा ! अथवा कुसुमचापपाशा ! ७



—न. चिं. केळकर

## ३०. कमळा

नभःशिलेवर कोर चमकते चढत्या चंद्राची
निकषावरची जशी ठळकशी रेषा सोन्याची !
शुद्धाधिष्ठाना मुदमंगलमय संकल्पाचें
शशिखंडाला होतें मंडण तैसें अंकाचें !

अत्युत्कट उत्कर्ष गुणांचा, तज्जन्य स्खलन,
मिळून अद्‌भुतरम्य मनुजता झाली निर्माण.
मृगलांछन त्या मानवतेचें परम रम्य चिन्ह,
परंधाम परमेश मौलिवर मिरवि अविच्छिन्न.

चंद्रकले गे ! चमक !—भरूं दे द्यावेसह धरणी—
भारतरमणी–गुणरत्नाकर–यशस्तरंगांनीं !
लोकोत्तर कोणे दृश्यावर जडलें तव चित्त–
अढळ रंगलें–सांग दीप्तिमय एकच रंगांत ?

निसर्गदुर्गम सह्याद्रीच्या प्राकारांवरुन–
शशिकिरणें गिरिदरींत घसरतां होती संचूर्ण !
निश्चल झाला निसर्गांतला धडधडता प्राण,
निश्चल वारापाणी, निश्चल कडे आणि रान.

निश्चल काळीं या शिवनेरी दुर्गप्रान्ताचें
प्रासादाचें उघडें दिसतें दार गवाक्षाचें.
कोमल आहे कोणी श्यामा चिंताकुल बसली,
लावण्याची किशोरगंगा वाट काय चुकली !

गूढत्वाचे, सुंदरतेचे, भावसघनतेचे,
नीलवर्ण हें द्योतक यांच्या निस्सीमत्वाचें;

मुसावला नीलिमा तोच ही नीलदेह रमणी,
निळ्या सारणीमधें वाहतें मोत्याचें पाणी !
कृष्णकेश मोकळे, स्वेदकण तेजस्वी भालीं,
कर्णभूषणांची बहुवर्णच्छवि गालीं पडली.
भृकुटींच्या महिरापांखालीं नेत्राचें युगल—
निमिषोन्मेषीं निर्मी नूतन नवल सृष्टिगोल;
चारु चिबुकनासिकादि गात्रें सारीं निर्दोष,
रुद्ध करुन ठेविलें बदलत्या त्यांनीं शोभेस !

—बी



## ३१. केवढें हें क्रौर्य !

क्षणोक्षणीं पडे, उठे परि बळें उडे बापडी,
चुके पथहि येउनी स्तिमित दृष्टिला झांपडी;
किती घळघळां गळे रुधिर कोमलांगांतुनी,
तशीच निजकोटरा परत पातली पक्षिणी.

म्हणे निजशिशूंप्रती 'अधिक बोलवेना मला,
तुम्हांस आजि अंतिचा कवळ एक मीं आणिला;
करा मधुर हा ! चला ! भरवितें तुम्हां एकदां
करो जतन यापुढें प्रभु पिता अनाथा सदा !

अहा ! मधुर गाउनी रमविलें सकाळीं जनां,
कृतघ्न मज मारितील नच ही मनीं कल्पना !
तुम्हांस्तव मुखीं सुखें धरुनि घांस झाडावरी
क्षणैक बसलें न, तों शिरत बाण माझ्या उरीं !

निघून नरजातिला रमविण्यांत गेलें वय,
म्हणून वाधिलें मला ! किति दया ! कसा हा नय !
उदार बहु शूर हा नर खरोखरी जाहला
वधून मज पांखरा निरपराध कीं दुर्बला !

म्हणाल भुलली जगा, विसरली प्रियां लेंकरां,
म्हणून अतिसंकटें उडत पातलें मी घरा;
नसे लवहि उष्णता, नच कुशींत माझ्या शिरा,
स्मरा मजबरोबरीं हरि दयाघना ईश्वरा. '

असो; रुधिर वाहुनी नच भिजो सुशय्या तरी
म्हणून तरुच्या तळीं निजलि ती द्विजा भूवरीं.
जिवंत बहु बोलकें किति सुरम्य तें उत्पल
नरें धरुनि नाशिलें, खचित थोर बुद्धी, बल !

मातींत ते पसरले अतिरम्य पंख,
केलें वरी उदर पांडुर निष्कलंक !
चंचू तशीच उघडी, पद लांबवीले,
निष्प्राण देह पडला, श्रमही निमाले !

—टिळक



## ३२. रुणुझुणु ये !

रुणुझुणु ये, रुणुझुणु ये झणकारित वाळा !
लुटुलुटुलुटु दुडुदुडुदुडु ठुमकत ये बाळा ! ध्रु०

धुंदि अजुनि रजानिनयनिं;
सावरूनि पदर धरुनि
शुभवदना उडुरदना देइ जांभयांला. १

दिग्ललना धौतमुखी
रत्नदीप कनकतबाकिं
घेउनिया बाहति या बालभास्कराला. २

काकड-आरति करिती
देवगृहीं नवयुवती;
आळविती; जागविती नन्द-नन्दनाला. ३

रजनितनय मारुतगण
नृत्य करिति चपलचरण,
तोम् तननन झूम् झननन करिति गायनाला. ४

जागति बघ चिउकाऊ,
लागति घरट्यांत गाउं;
डोलति तरु, लागति करुं ते हरिभजनाला. ५

जागति गोठ्यांत गाइ,
पाजति वत्सांस पाहिं;
ये रांगें ! कळ लागे माझिया स्तनांला ! ६

—भा. रा. तांबे

## .३३. पांखरा ! येशिल का परतून ?

पांखरा ! येशिल का परतून ?
मत्प्रेमानें दिल्या खुणांतुन
एक तरी अठवून ? पांखरा !
हवेसवें मिसळल्या माझिया
निःश्वासा वळखून ? पांखरा !
वाऱ्यावरचा तरंग चंचल
जाशिल तूं भडकून ! पांखरा !
थांब, घेउं दे रूप तुझें हें
हृदयीं पूर्ण भरून ! पांखरा !
जन्मवरी मजसवें पहा ही
तव चंचूची खूण ! पांखरा !
विसर मला, परि अमर्याद जग
राहीं नित्य जपून ! पांखरा !
ये आतां ! घे शेवटचे हे
अश्रू दोन पिऊन ! पांखरा !

—टिळक



## ३४. विश्वामित्रीच्या कांठीं

बघुनि मन धालें,
साफल्य दृष्टिचें झालें ! ध्रु०

पाउस बर्फाचा जणुं पडतो;
रजताचा जणु मेघ वितळतो;
किंवा चंद्रकांत पाझरतो;
जणूं शीतांगी—
मत्प्रिया मला आलिंगी ! १

शीतल चंदनरसांत पडलों;
अथवा अमृतडोहिं बुडालों;
किंवा सुस्वप्नीं सांपडलों;
न कळे कांहीं—
जिव वेडावुनि हा जाई ! २

शांतिदेवता निराकारिणी
वसते जणुं या मंगल स्थानीं;
सांगे मजला या उद्यानीं,
" चंचल बाला !—
बघ इथें जगन्नाथाला ! " ३

सृष्टिसुंदरी नटली थटली,
सूक्ष्म धवल वल्कला नेसली;
खुलली जणुं कुसुमवेली फुलली;

रम्य ही शोभा—
हिजपुढें काय ती रंभा ! ४

शांत तटिनि जणुं पथ स्फटिकाचा
जातिपुष्पपथ वनदेवीचा
किंवा ओघ सजिव रजताचा
कीं रत्नाची—
मेखलाच उद्यानाची ! ५

विश्वामित्रीजाळें या काळीं
तटवनभूमी बिंबित झाली;
वरतीं तैसें दिसतें खालीं;
अद्‌भुत झालें—
पाताळ आज पाहीलें ! ६

तारागणही स्पष्ट बिंबले,
स्नाना जणुं हे मुनि अवतरले;
तेजोनिधि कीं ऋषी बैसले;
ध्यान धरोनी—
जलसमाधिस्थ होवोनी ! ७

शशिरायाही आंत उतरला,
कलहंसापरि पोहुं लागला;
तटिनीनें जणुं हृदयीं धरिला;
प्रेमळ कांत—
पाहुनी इथें एकांत ! ८

जेथें असली श्रेष्ठ मंडळी,
तिथेंच गरिबा जागा दिधली;
शंका सखये! परि उद्भवली,
खरी मम काया—
उदकामधिं वा भूवरि या ! ९

वरतीं खालीं दिसतें गगन;
मध्यें लंबित अपुलें भवन;
वातावरणीं आधाराविण
गोजिरवाणी—
फेंकिला चेंडु हा कोणीं ! १०

वरतीं खालीं ही शशिकांती;
द्विगुणित शोभा, द्विगुणित शांती;
द्विगुणित आनंदाची भरती,
दृष्टि बावरली—
वर पाहूं किंवा खालीं ! ११

स्मरणशक्तिके जागृत होई;
दर्शनदुर्लभ शोभा पाहीं,
विसरुं नको बघ यांतिल कांहीं;
वारंवार—
कोठुनि असें दिसणार ? १२

—दत्त



## .३५. गंगाद्वारीं भजन

१

उलटुनि गेली मध्य–निशाही, जीवन–कलह जगीं शमला,
जन निद्रावश गमतो सोऽहं–मंत्रें भारियलाच मला;
पान न हाले, शब्द निमाले, स्वानंदीं जग मग्न दिसे,
तव भक्तीची ‘ भंग ’ पिउनि मज गंगे ! भरलें स्फूर्ति–पिसें.

भवभट्टीमाधें तावुनि तावुनि विजनजलीं जें निववियलें,
मंत्रघनानें पिटुनि, ओढिलें विचार–जंत्रांतोनि बलें,
जें मननामें कांचन त्याची सतार ही रव काय करी,
“ जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरी. ”

येथ शिवानें जटा फटाफट आपटुनी तुज वाहविली,
गोवधपापें अनुतापाकुल गौतमतनु अवगाहविली,
धन्य महात्मा ! आपण तरला, तारियलें जग निरंतरीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं.

गिरिशिखराहुनि जगदाधारा धारा ही तव अवतरते
छुमछुम झुमझुम जलकलरव हें नादब्रह्मच कीं नटतें ?
राहिन हे तव जलधारारव अवधाराया या शिखरीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरी.

विमल विमल हें कसें तुझें जल, गंगे ! गंगाजलाचि जसें,
सुंदर सुंदर ! वसुंधरेंतील सुंदरतेचें सार दिसे.

किति सुखशीतल ! सत्संगासम आश्रिततनुमन गार करी;
भवजालांतहि बद्ध जनांच्या आणुनि देतें मोक्ष करीं.

मधुर मधुर गे ! अविकृत केवल दैवी प्रेमचि हें गळतें.
वैतरणीच्या उलटचि याची संतत गति जरि चंचळ ते
पावन पावन गंगे ! तुजसम तीर्थमहात्म्य न भूमिवरी.
पुष्कर राजा म्हणवुनि लोकीं पूज्य विधी इतुकाच तरी.

जगताच्या इतिहासांतिल हें सत्याचें संशोधन कीं ?
कीं सृष्टींतिल पुराण तें हें ? स्मृतिचें हेंच निवेदन कीं ?
कीं हा संगम षडागमांचा ? की निगमांचें सार खरें ?
अनुपम ऐशा आत्मरसाचा हा अवतारचि कां न बरें ?

२

भूतांवरिचें तव वात्सल्याचे अमृतमिषें हें संभवलें,
द्रवलें चंद्रकलामृत यांतचि शिवचरितामृत कालवलें;
त्रिगुणित ऐसें हें परमामृत पाजुनि तृष्णा दूर करी.
जय संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं.

गिरिकंदरिं हा गंगाद्वारीं तव तीर्थाचा निधि जमला,
सन्निध ह्याच्या येतां भासे झाला चंदनलेप मला;
कर्पूरांजन ! नयन निवाले, सात्त्विक धारा अवतरती,
ह्या तव ममतासुधाकरें जणुं चंद्रमणी हे पाझरती.

थंडावुनि ह्या थंडाईनें हाव भवाची उपशमली,
शुष्क सुखांची मृगतृष्णा ही रालज्वालेसम शमली;

शांत मनाला प्रसन्नता ये गंगे ! या तव जलापरी,
स्वानंदाच्या ठुमकति त्यावरि मनोज्ञ मंजुलशा लहरी !

स्फटिकशिलेच्या मंचावरतीं कोमल किसलयसुमशयनीं,
भूरंभेच्या परिरंभामधिं, धवल वसंतांतिल रजनी
अनुभविणाऱ्या अरे नरेंद्रा ! विगलित कां तूं हिरमुसला ?
ही सुखशांती न हि, विषयान्तीं असतो विरसचि ठेवियला.

सकल मलांचें भंजन कीं हें ? विकल मनांचें रंजन कीं ?
विषयांधांचें अंजन कीं हें ? ज्ञानमधूच निरंजन कीं ?
कीं संजीवन वैराग्याचें, शांतरसामृत खरोखरी !
त्याचा एकहि कण प्याल्यावरि चर्चा मम यम काय करी ?

हें मुक्तीचें केलिसरोवर, यांतुनि हो रममाण मना !
जगदात्म्याचें निर्मल बिंबाचि तूं प्रतिबिंब सजें सुजनां !
परम सुखाचा डोह शरीरा ! मार बुडी तूं स्नान करीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं.

ध्यानहि जरि तव पावन करितें, स्नान तरी वद काय करी !
स्नान, पान, गुणगानहि केलें, देशिल फल मग काय तरी !
अधिकाचें फल अधिकचि म्हणती; पण तें माझ्या ठेव करीं.
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोदे ! भवताप हरीं.

जन्मुनि तीरीं, पिउनि तुझें पय, न करिति तव गुणगौरव हा,
अधमपणास्तव चुकेल का गे सांग मला तरि रौरव ? हा !

तव गुण गातां रमवुनि यमही झुलविन शब्दब्रह्म करीं,
जय् संजीवनि जननि पयोदे श्रीगोंदे ! भवताप हरीं.

शब्दब्रह्मीं जो कवि कसला, त्याला रौरव मग कसला ?
नित्यानंदें पूर्ण विकसला, परं-ब्रह्मपदिं तो वसला.
परं-ब्रह्मपदिं तुझ्या झऱ्यामाधिं समरसला तो दुधापरी,
' पुनरपि जननं पुनरपि मरणं ' यांची ओळख तो न धरी.

—चंद्रशेखर



## ३६. सृष्टीची करमणुकीची घटका

वसन्त ज्या म्हणती,
सकल जन, वसन्त ज्या म्हणती,
ती सकल सृष्टिची करमणुकीची घडी मला दिसती !

नवीं नवीं येती,
पांखरें, नवीं नवीं येती,
हीं फुलें उधळिती कुणी नभांतुन जणुं वाऱ्यावरतीं !
तरुवल्ली दिसती नवाभरणमाण्डिता,
ये स्फूर्ति पिकादिक गानकलापण्डितां !
वनिं करमणुकीस्तव जमती वनदेवता;
हर्षा नाहिं मिती,
खरोखर, हर्षा नाहिं मिती !
हे कपोत, केकी नर्तन करिती, ताल झरे धरिती !

नवीं फुलें फुलतीं,
वसन्तीं, नवीं फुलें फुलतीं,
जणुं तारे उतरुन करमणुकीस्तव धरणीवर येती !
यजमान निमंत्रितजनीं जसा वावरे,
हा मंद सुगन्धित वायु तसा संचरे,
इतरांस सौख्य जें तें याचें सुख खरें !
भ्रमर मला म्हणती—
मुदित हे, भ्रमर मला म्हणती,
ये ! वसन्त आहे तोंवर करुं ये आपण गुणगुण ती !

सकलश्रमविरती,
खरी ही, सकलश्रमविरंती,
हा वसन्त म्हणजे पुम्हां सांगतों करमणूक नुसती !
हें मूर्तविनोदन सृष्टिसवें संगत,
हें मनोभावनादर्शामधलें स्मित !
हा प्रसाद काव्यामधला कविसम्मत
ही सृष्टीवरतीं,
खरोखर, ही सृष्टीवरतीं,
नरनारींवरतीं कृपा प्रभूची केवळ सुखभुक्ति !

—टिळक



## ३७. पुष्पाप्रत

पुष्पा! सुन्दर किती तूं दिससी!
सौकुमार्य माधुर्यहि धरिसी!
तुजला बघतां मन माझें तूं–वेडें रे करिसी? १

तूं आणिक मी पूर्वी होतों
खेळगडी रे! स्मरुनि अहा! तो
काळ सुखाचा, आतां चित्ता–खेद फार देतो! २

मुग्ध मधुरता चित्तीं घेतां
पूर्वी अपुली होती समता.
गेला गेला काळ अहह तो!–फेर किती आतां! ३

सौकुमार्य तव अजुनी आहे!
हंसतचि आहे हास्य तुझें हें;
परि मम भाळीं ढग अश्रूंचा–हाय! डवरलाहे! ४

तुजला पाहुनि मीं नांचावें,
दुडदुड धांवत तुजशीं यावें
प्रेमें तुजला स्वकरीं घेउनि–सखया चुंबावें! ५

आतांहि गमे घ्यावें तुजला,
परी सुटतसे कंप कराला!–
दिव्यत्वाला स्पर्श कराया–भय वाटे मजला! ६

रम्य धुक्याची अद्‌भुत सृष्टि
तींत उघडिसी अपुली दृष्टि,
मग तो भास्वान् तुजवरि करितो—तेजाची वृष्टि ७

मरुद्गण तुझ्या पाळायाला
तत्पर आंदोलन द्यायाला,
पक्षिमुखांहीं स्वर्ग तुझ्यावरि–गाई गीताला ! ८

रम्य तुझें बा जिणें कितीतरि,
परिमलयश तव जाय भूवरी,
कालहि तुझिया दिव्यत्वाला–वाटे नमन करी ! ९

चिरतरुणा रे ! चिररुचिरा रे !
तुजसंनिध तो वास बरा रे !
तुजमजमध्यें परी केवढी–आहे रुंद दरा रे ! १०

काळोखाच्या जगामधें या
मृत आशांच्या चितांवरुनिया
पिशाच माझें भटकत आहे,--शांति नसेचि तया ! ११

मच्चित्ताच्या क्षितिजावरतीं
नृत्याला जीं स्वप्नें करिती
निदान, त्यांच्यामध्यें मजला -भासो तव मूर्ति १२

सौभाग्य पुष्पा ! तव गात्रयाला
मी पात्र नाहीं गमतें मनाला;
भुंगे तुझें स्तोत्र सुरेख गाती
ऐकूनि तें सर्व पळोत खंती ! १३

— केशवसुत



## .३८. वनवासी फूल

पुन्हां पुष्प तें हांसुन वदलें ‘ बसा, दुरूनी बोला !
योग्य न शिवणें,–जगदीशाला अर्पित झालें,–त्याला !
दो दिवसांचें जीवित माझें दिधलें मी परमेशा,
ध्यावें त्याला आहें तोंवर, अन्य नसे मज आशा !
मला समजलें, रसज्ञ आपण मित्र फुलांचे लोकीं,
यास्तव अपुलें स्वागत केलें, श्रम अपणां दिधले, कीं.
कवीश आपण, ओळखिलें कीं भक्तिरसाचे सिन्धु !
वनवासी मी, द्या मज दीना दोनचार तरि बिन्दु !
बसा घडीभर, परमात्म्याला आपण दोघें गाऊं,
भक्तिरसाचें अनुपम, रुचिकर, बलकर भोजून सेवूं.
याहुन दुसऱ्या आतिथ्याची नको कल्पना येथें.
मान्य करुन घ्या कृपा करोनी या दीना साधे तें । ’
प्रेमोर्मी मधु, असंख्य, मृदु मृदु, कविच्या हृदयीं उठती,
नयनीं, गालीं, अधरीं येउन हळूंच त्या आदळती.
प्रेमयोगनिद्रेच्या घेई क्षणैक तो उपभोगा,
दचकुनि किंचित् पुन्हां जहाला स्वयें कवीश्वर जागा.
हांसुन बोले त्या सुमनाला ‘ पवित्र जगिं तूं साचें !
वैराग्याचें निधान दिससी मजला भक्तिरसाचें !
परन्तु जातें वनांत तव हें यौवन मित्रा वायां,
ज्ञाते म्हणती जन साधन हो पुरुषार्था साधाया.
निर्जन रानीं जेथें न दिसे एक सख्या ! फुलझाड,
उच्च शाल्मली, देवदारु, वट, पिंपळ, दिसती ताड.

तुझ्याभोंवतीं क्षुद्र वनस्पति माजुन तुज नाहींसें
करावयाला झटती,—गगनीं नक्षत्रा घन जैसे.
कधीं न येथें आला वाटे भ्रमर फुलांचा भोक्ता,
मजविण इतर न तुला भेटला दिसे गुणांचा ज्ञाता !
तूं येथें हें कुणा न ठावें, नाहीं तर भ्रमरांच्या
झुंडी येत्या धावत कविंच्या स्वर्गांतुन रसिकांच्या !
सर्व अप्सरा, किन्नर सारे धावुन येथें येते,
सख्या फुला! तुजमुळें हाच रे दुसरा स्वर्ग करीते!
कोमलता ही, रङ्ग तुझा हा, हास्य तुझें हें नामी,
सौरभ तव हा, पुरे! मजसवें चल सखया आरामीं!"
'उद्यानीं मम नाश निश्चयें!' म्हणे कवीला फूल
'वयें तरुण तूं परी अनुभवें दिसशी अजाण मूल!'.
वन्य पुष्प तें निस्पृह पुरतें जगास सोडुन बसलें,
नवल कशाचें त्या मान्याला अवमानुन जरि बोले?
'आपण' सुचवी प्रथमदर्शना, 'तुम्ही' परिचयालागीं,
'तूं' सुचवीतें दोघें झालीं पूर्णपणें अनुरागी!
कळो फुलाला, न कळो अथवा, तथापि हा क्रम साचा
ओळखुनी, कविहृदय घे नवा अनुभव उल्लासाचा.
पुन्हां म्हणे सुम 'सारा स्वार्थी मर्त्यलोक हा आहे!
दर्शन राहो दूरच! याचें नांव न मजला साहे!
थर थर थर थर पंख कांपती, उरलें नाहीं भान,
पुष्पीं रत मधुपास भासतें पुष्पच पञ्चप्राण!
स्वार्थाचे हे अवघे चाळे! अमुची वेडी जात!
भ्रमराचें मज नको पहाया मुख साऱ्या जन्मांत!

ज्या ज्या सुमनीं रमेल तें तें तितक्यापुरतें त्याचा
जीवच ! परि हें प्रेम न; सगळा लोभ नवीन रसाचा !
नित्य करावें पुढें पुढें, मधु गाणें गावें, न्यावें
लुटून सुरसा, परी शेवटीं ओळख विसरुन जावें !
कोण अशांच्या पाशामध्यें पडेल सांग शहाणें ?
योगी म्हणती यास्तव, कीं, 'सुख दूर वनांत रहाणें' !
भ्रमर एकला मात्र नीच नच, परि जग सारें नीच !
निश्चय झाला मम, कीं जगतीं निवास ही हानीच !
फळें तोंवरी द्विजरायाचें गायन चाले वृक्षीं !
सरतां तीं परि, परके होती वृक्ष आणखी पक्षी !
कार्य साधितो तोंवर मिळती आशीर्वाद घनाला,
थोडा चुकतां शिव्याशाप मग नकोनकोसे त्याला !
'**शितें तोंवरी भुतें भोंवतीं**' म्हण ही साधी भारी,
परि अनुभूती सकल बुधांची हींत ओतिली सारी !
जगीं चहुंकडे स्वार्थ, नीचता, मूर्खपणा, अभिमान !
हार म्हणोनी सापासाठीं कोण पुढें करि मान ?
'उषा आणि मी परस्परांना बघतां सस्मित होतों,
या प्रेमाचा अनभव जगतीं कोठुन दुसरा हो तो !
दर्शन माझें हाच लाभ तिज, तद्दर्शन मज लाभ,
कधिं न ठाऊका स्वार्थें केला अमुचा चित्तक्षोभ.
कोठें दिनकर, दीन कुसुम मी कोठें ! तरि कुरवाळी
सर्व उग्रता सोडुन मजला, कन्येसम सांभाळी !
दिशादिशांना सौरभ माझा वाहुनि वारा नेतो,
नको नको मी म्हणतां कुतुकें यश माझें पसरीतो !

सृष्टीही हिममिषें मनोहर नव मोत्यांची जाळी
घाली मजवर ! सजवी मजला ! माय तशी प्रतिपाळी !
सोडुन असले मित्र निधी हे निष्कामप्रेमाचे,
धूळ जगाची माथां घेणें कोण म्हणे कामाचें ?
गायन ऐकुन तुझें वाटलें ज्ञाता तूं कविराज,
परी जगासम तूंही मोहित मोहक, समजे आज !
सुन्दर विषफल दिसे वरोनी,–जग हें केवळ तैसें
तुज विषकृमिला पीयूषाचें निधान फल हें भासे !
जा ! जा ! जा ! जा ! जा रम जगतीं, उद्यानीं वा सदनीं !
बुद्धिभेद मम करूं नकोरे असल्या मोहक वचनीं !'

—टिळक



## ३९. कारंजें

हें अवलोकुनि कारंजे
ग हृदया रसिका रंजें ॥ ध्रु० ॥

रविप्रकाशामाझारीं
याचें तेजोमय वारी
चमके, मुक्तेच गगनाचे
घ्याया थै थै जणुं नाचे. १

पडुनि चंद्रिका यास करी
धवल हिमाहुनि नवलपरी;
विलसति किति ह्या जलधारा
शुद्ध रुप्याच्या जणुं तारा. २

ह्या बिंदूंचे तों होती
गोल अमोल विमल मोती;
हंसोत अथवा जवाहिरे,
मी तों म्हणतों यांस हिरे! ३

होतां जल पवनाकुल तें
फूलाचि जणुं झुलतें झुलतें
न दिसो तमांत तारांनीं
उमगे मंजु तुषारांनीं. ४

सततोत्साहें, आनंदें,
उडतें पडतें निज छंदें;
पडुनहि उंच उडायाला
याला श्रम न कदा झाला. ५

सुदिन–दुर्दिनीं उल्हासें
हांसे सम, सुंदर भासे
खालीं वरतीं सतत गती,
गती विराम तया मग ती. ६

शील करी जें तद्घटना,
ना तें शक्यचि आकलना.
शाश्वत अशाश्वती ज्याला
तीच शाश्वती मग त्याला. ७

स्पृहावंत जरि निरंतरीं
तरीहि निस्पृह निरंतरीं.
तमें तमोमय हें असतें,
तेजें तेजोमय दिसतें. ८

अभिनव, सतत, जरी लहरी,
उन्नत, चिंताजाल हरी;
गुणगुणुनी गुणगण हे तूं
तूंहि असें हो हा हेतू. ९

—चंद्रशेखर



## ४०. रानांत एकटेंच पडलेलें फूल

वन सर्व सुगंधित झालें.
मन माझें मोहुन गेलें—किति तरी !
मीं सारें वन हुडकीलें,
फुल कोठें नकळे फुललें—मज तरी.
स्वर्गांत
दिव्य वृक्षास
बहर ये खास,
असें कल्पीलें—असें कल्पीलें;
मन माझें मोहुन गेलें—किति तरी !
परि फिरतां फिरतां दिसलें
फुल दगडाआड लपालें—लहानसें
दिसण्यांत
फार तें साधें,
परी आमोदें
जगामधिं पहिलें—जगामधिं पहिलें;
मन माझें मोहुन गेलें—किति तरी !
मी प्रेमें वदलों त्याशीं,
'कां येथें दडुनी बसशी—प्रिय फुला !
'तूं गडे
फुलांची राणी,
तुला गे कोणीं
रानिं धाडिलें—रानिं लावीलें ?'
मन माझें मोहुन गेलें—किति तरी !

तें लाजत लाजत सुमन
मज म्हणे थोडकें हंसुन ! तधवां
‘ निवाडिलें
प्रभूनें स्थान
रम्य उद्यान
तेंच मज झालें–तेंच मज झालें.
मन माझें मोहुन गेलें–किति तरी ! ’

—टिळक



## .४१. कृष्णा–कोयनांचा संगम

सखे गे, सुरेख संगम किती, कृष्णा मिळली कोयनेप्रति
किति विशाल तट हे अहा !
प्रिय सखे उभी तूं रहा;
क्षण येथिल शोभा पहा
सखे गे० १

बहु चकाकते यावरी
ही सुरेख सिकता, परी
जाय गळूनि धरितां करीं
सखे गे० २

जगिं असे सुखाचे क्षण
नर झटे धराया, पण
जाति तयास ते फसवुन
सखे गे० ३

झष जलीं उड्या मारिती,
भय न यां, सुखी हे किती ?
भवजलीं रमूं या रिती
सखे गे० ४

बंध दोघिंचि मैत्री किती
एकमेकिस आलिंगिती;
दोन असून एकचि होती
सखे गे० ५

जर अशींच अपुलीं मनें
एक होतिल गे प्रीतिनें,
मग सुखास कुठुनी उणें
सखे गे० ६

स्थळ पवित्र हें गे जगीं
जन बघेल जो लोचनीं
अघ हरेल त्याचें क्षणीं
सखे गे० ७

—माधवानुज



## ४२. नैर्ऋत्येकडला वारा

जे जे वात नभांत या विचरती पुण्यप्रदेशावरी
नैर्ऋत्येकडला तयांत वितरी सौख्यास या अंतरीं;
येतां तो मम चित्त हें विसरुनी प्रत्यक्ष वस्तूंप्रति,
अर्धोन्मीलित लोचनीं अनुभवी स्वप्नस्थिती मागुती ! १

तो वारा मम जन्मभूमिवरुनी येतो जवें वाहत,
हें माझ्या हृदयांत येउनि सवें मी ठाकलों चिन्तित;
माझ्या जन्मधरेचिया मग मनीं रूपास मी आणितों,
तीचे डोंगर उंच, खोलहि नद्या डोळ्यांपुढें पाहतों. २

मोठे उच्च, शिला किती पसरल्या सर्वत्र ज्यांच्यावरी,
तुंगें तीं शिरलीं यदीय शिखरें तैशीं नभाभीतरीं,
आस्वर्गात् चढती सदोदित महात्म्यांचीं जशीं मानसें,
या दृष्टीपुढते पुनः बघतसे अद्रीश ते हो असे ! ३

ज्यांच्या रम्य तटांवरी पसरल्या झाड्या किती सुन्दर,
ज्यांच्या थोर शिलांतुनी धबधबां जाती तसे निर्झर
वाणीचे कविदुर्दशांमधुनियां ते ओघ यावे जसे;—
या दृष्टीपुढते पुनः बघतसे अद्रीश ते हो असे ! ४

त्यांचे उंच शिरांवरी विलसती किल्ले मराठी जुने,
देवी पालक त्यांतल्या मज पुनः धिक्कारिती भाषणें—
"कोठें पूर्वज वीर धीर तव ! तूं कोणीकडे पामरा !
ये येथें ! इतिहासपत्र पडकें वाचूनि पाहीं जरा !" ५

जागोजाग विराजती चलजलें पाटस्थलें तीं किती,
केळी, नारळि, पोफळी, फणस ते, आंबे तिथें शोभती;
पक्षी त्यांवरुनी नितान्त करिती तें आपुलें कूजित,
स्वप्नीं हें बघतां फिरूनि, मन हें होतें समुत्कण्ठित. ६

जागोजागहि दाटल्या निबिड कीं त्या राहट्या रानटी,
ते पाईरहि, खैर, किंजळ, तिथें आईनही वाढती,
वेली थोर इतस्ततः पसरुनी जातात गुंतून रे,
चेष्टा त्यांमधुनी यथेष्ट करिती नानापरी वानरें ! ७

जन्मस्थान मदीय सुन्दर असे, त्या माल्यकूटांतल्या
आनन्दें वनदेवता मधुर जीं गानें भलीं गाइल्या
मज्जन्मावसरास, तीं पवन हा वेगें पहा तेथुनी
मातें पोंचवितो, तयां अपुलिया पंखांवरी वाहुनी !— ८

" गाऊं या ! हृदयांत या अमुचिया प्रीती असे दाटली !
गाऊं या ! हृदयांत या अमुचिया कां स्फूर्ति ही वाढली ?—
वाग्देवीसुत जन्मला अपुलिया ग्रामांत; यालागुनी
जैजैकार करा, सुरां परिसवा हा मंगलाचा ध्वनि ! " ९

वेगानें जगदुद्धरा नदिचिया तीरांहुनी वात तो
आशीर्वाद मदीय तातजननी यांचे मला आणितो;
वात्सल्यास तयांचिया परिसुनी माझ्या मनीं येतसे—
' तान्हा बाळचि राहतों तर किती तें गोड होतें ' असें ! १०

आईच्या नयनांत नित्य मग मी स्वर्गास त्या पाहतों,
तातांकावरि नित्य मी मग जगद्राज्यासना भावितों;

कां हो यापरि वाढलों फुकट मी ? हा–हंत ! मी नष्ट हा !
तान्हा बाळचि राहतों तर किती तें गोड होतें अहा ! ११

जन्मा येउनि मीं उगा शिणविलें आई ! तुला हाय गे !
ताता ! भागविलें तुला फुकट मीं मत्पोषणीं हाय रे !
वार्धक्यीं सुख राहिलें, विसरणें तुम्हांस कोणीकडे !
झालों कष्टद मात्र; या मम शिरीं कां वीज ती ना पडे ? १२

पुष्पें वेचित आणि गोड सुफलें चाखीत बागांतुनी
जेथें हिंडत शैशवीं विहरलों निश्चिन्त मी, तेथुनी–
हा वारा ममताप्रसाद मजला आजोळचा आणितो;
चित्तीं विव्हल होतसें स्मरुनि, मी मातामहां वन्दितों ! १३

बन्धूचींहि मला तशीं पवन हा आशीर्वचें आणितो,
चिन्ताग्रस्त तदीय पाहुनि मुखा अश्रूंस मी गाळितों !
भाऊ रे ! तुजलागिं लाविन कधीं मी हातभारा निज ?
तूंतें सेवुनि मी सुखें मग कधीं घेईन का रे निज ? १४

श्वासांहीं लिहिलीं, विराम दिसती ज्यांमाजि बाष्पीय ते,
प्रीतीचें बरवें समर्थन असे संस्पृह्य ज्यांमाजि तें,
कान्तेचीं असलीं मला पवन हा पत्रें अतां देतसे;
डोळे झांकुनि वाचितां त्वरित तीं सम्मूढ मी होतसें ! १५

आतां प्रेमळ तीं पुनः परिसतों थोडीं तिचीं भाषणें,
चित्तीं आणुनि मी तिला अनुभवीं गोडीं तिचीं चुम्बनें !
ओठां हालवितां न मी वदतसें मागील संवाद तो;
मी काळ क्रमुनी असा जड जगा काडीवजा लेखितों ! १६

नाहीं चैन तुला मुळीं पडत ना माझ्याविना मत्प्रिये ?
तूंतें आठविल्याविना दिवसही माझा न जाई सये !
केव्हां येतिल तीं दिनें न करण्या ताटातुटी आपुली ?
केव्हां त्या रजनी ?—जियांत विसरूं मीतूंपणाला मुळीं ? १७

माझ्या जन्मधरेपुढें दिसतसे वाराशि विस्तीर्ण तो,
त्याचें रम्य तरंगताण्डव पुनः पाहूनि आल्हादतों,
जें हृद्रम्य तरंगताण्डव मला तैशापरी वाटतें,
अज्ञेयावरती जसें क्षणिक हें अस्तित्व हो खेळतें ! १८

या अब्धीवरतूनि जात असतां बाल्यांत नौकेंतुनी,
गाणीं जीं म्हटलीं मला निजविण्या वारिस्थ देवीगणीं,
त्यांचे सूर अतां अलौकिक असे जे वात हा आणितो—
ते ऐकून अहा ! सुषुप्ति चिर ती घ्यायास मी इच्छितों ! १९

प्रीती या जगतांत कण्टकयुता ही एक वल्ली असे,
शूलारोपणयूप त्यावरिल ही कीर्तिध्वजा कीं दिसे.
तेव्हां यों जगतीं नकोत मजला ते भोग भोगायला,
वाटे नाटक शोकसंकुल असें जीवित्व हें याजला ! २०

देवी सागरिका ! तुम्हीं तर आतां तीं गायनें गाइजे,
त्यांच्या धुंद अफूगुणें किरकिऱ्या बाळास या आणिजे
निद्रा दीर्घ—जिच्यामधीं न कसलीं स्वप्नें कधीं येतिल,
ती निद्रा निजतां न मन्नयन हे ओले मुळीं होतिल ! २१

—केशवसुत



## ४३. घन तमीं शुक्र बघ राज्य करी !

घन तमीं शुक्र बघ राज्य करी,
रे खिन्न मना, बघ जरा तरी ! ध्रु०
ये बाहेरी अंडें फोडुनि
शुद्ध मोकळ्या वातावरणीं,
कां गुदमरशी आंतच कुढुनी ?
रे ! मार भरारी जरा वरी. १
प्रसवे अवस सुवर्णा अरुणा,
उषा प्रसवते अनन्त किरणां,
पहा कशी ही वाहे करुणा—
कां बागुल तूं रचितोस घरीं ? २
फूल हसे काव्यांत बघ कसें,
काळ्या ढगीं बघ तेज रसरसे,
तीव्र हिमांतुनि वसन्तहि हसे,
रे, उघड नयन, कळ पळे दुरी. ३
फूल गळे, फळ गोड जाहलें,
बीज नुरे, डौलांत तरु डुले;
तेल जळे, बघ ज्योत पाजळे;
का मरणिं अमरता ही न खरी ? ४
मना, वृथा कां भीशी मरणा ?
दार सुखाचें तें हरि-करुणा !
आई पाही वाट रे मना,
पसरोनि बाहु कवळण्या उरीं. ५

—भा. रा. तांबे

## ४४. दीपविसर्जन

करीं आरती घेउनी आर्यबाला
त्वरें पातल्या नर्मदेच्या तटाला;
करूनी तयांनीं सरित्पूजनाला
प्रवाहीं दिली सोडुनी दीपमाला. १

अहा काय शोभा वदूं त्या क्षणाची
तृषा शांत झाली मदीयेक्षणाची;
तदा अस्तगामी जरी अंशुमाली
मना वाटलें यामिनी काय झाली. २

सरित्पात्र तें स्वच्छ तैसें विशाल
तदा भासलें कीं दुजें अंतराल;
तती त्यावरी शोभली दीपिकांची
उदेली जणों पंक्ति कीं तारकांची. ३

जशी अंतरिक्षीं फिरे चंद्रकोर
प्रवाहीं करी रम्य नौकाविहार;
नभीं स्वैर संचारतो मेघखंड,
जलीं खेळती वीचि तैशा उदंड. ०

अशी दिव्य शोभा पहातां पहातां
मनीं शांत झालों, लया जाय चिंता;
झणीं सूचली कल्पना एक चित्ता
असे सर्व सृष्टीस जी मूलभूता. ५

दिले सोडुनि दीप जैं बालिकांनीं
दिला सारिखा वेग सर्वां तयांनीं;

तयांची स्थिती तत्क्षणीं भिन्न झाली
वरी दृश्य कोणी, कुणी जाय खालीं. ६

कुणी गुंतुनी राहिले भोवऱ्यांत,
जलौघासवें जाय कोणी वहात;
तयांतील कांहीं तटा अन्य गेले,
पुढें जाऊनी अल्प मागेंच आले. ७

जसे दीप तैसे असंख्यात जीव
प्रभू निर्मितो, थोर ज्याचा प्रभाव;
तया सोडुनी देत काल–प्रवाहीं
वहाती तदौघासवें सर्व देही. ८

कुणी रंक होई, कुणी होय राजा;
दुजा देखणा हो, तिजा हीनतेजा;
कुणी मूर्ख होई, कुणी हो शहाणा;
कुणी धैर्यशाली, तसा भ्याड जाणा. ९

तसें कां करावें ? असें मी करीन,
वृथा वल्गना मानवांच्या अजाण;
स्थितीचा असे किंकर प्राणिमात्र,
स्थिती त्या करी पात्र किंवा अपात्र. १०

जरी राहिलें नर्मदातीर दूर
जरी आज बाला न दृष्टीसमोर;
स्मरोनी तरी दीपसर्गप्रसंग
क्षणीं हर्षयोगें भरे अंतरंग. ११



—माधवानुज

## ४५. तुतारी

एक तुतारी द्या मज आणुनि,
फुंकिन मी जी स्वप्राणानें,
भेदुनि टाकिन सगळीं गगनें
दीर्घ जिच्या त्या किंकाळीनें;—
अशी तुतारी द्या मजलागुनि. १

अवकाशाच्या ओसाडींतिल
पडसाद मुके जे आजवरी,
होतिल ते वाचाल सत्वरी
फुंक मारितां जीला जबरी—
कोण तुतारी ती मज देईल ? २

सारंगी ती, सतार सुन्दर,
वीणा, बीनहि, मृदंग, बाजा,
सूरहि, सनई, अलगुज माझ्या—
कसचीं हीं हो पडतिल काजा ?
एक तुतारी द्या तर सत्वर. ३

रूढी जुलूम यांचीं भेसुर
सन्तानें राक्षसी तुम्हांला
फाडुनि खाती, ही हतवेला—
जल्शाची का ? पुसा मनाला !
तुतारीनें ह्या सावध व्हा तर ! ४

अवडम्बरलीं ढगें कितीतरि,
रविकिरणांचा चूर होतसे,
मोहर सगळा गळुनि जातसे,
कीड पिकांवरि सर्वत्र दिसे !
गाफीलगिरी तरिहि जगावरि ! ५

चमत्कार ! ‘ तें पुराण तेथुनि
सुन्दर सोज्वळ, गोडें, मोठें !
अलिकडलें तें सगळें खोटें ! ’
म्हणती धरुनी ढेरीं पोटें;
धिक्कार अशा मूर्खांलागुनि ! ६

जुन्या नभीं या ताजे तारक,
जुन्या भूमिवर नवी टवटवी,
जुना समुद्रिं नव रत्नें वी;
जुन्यांतून जी निष्पत्ति नवी–
काय नव्हे ती श्रेयस्कारक ! ७

जुनें जाउं द्या मरणालागुनि,
जाळुनि किंवा पुरुनी टाका,
सडत न एक्या ठायीं ठाका,
सावध ! ऐका पुढल्या हाका !
खांद्यास चला खांदा भिडवुनि ! ८

प्राप्तकाल हा विशाल भूधर,
सुन्दर लेणीं तयांत खोदा,
निजनामें त्यावरती नोंदा
बसुनी कां वाढवितां मेदा ?
विक्रम कांहीं करा, चला तर ? ९

अटक कशाची बसलां घालुनि !
पूर्वज वदले त्यां गमलें तें,
ऐका खुशाल सादर चित्तें,
परन्तु सरका विशंक पुढते-
निरोप त्यांचा ध्यानीं घेउनि. १०

निसर्ग निर्घृण त्याला मुरवत-
नाहीं अगदीं पहा कशाची !
कालासह जी क्रीडा त्याची,
ती सकलांला समान जाची-
चुरुनी टाकी प्रचंड पर्वत ! ११

त्याशीं भिडुनी, झटुनी, झगडत
उठवा अपुले उंच मनोरे,
पुराण पडक्या सदनीं कां रे
भ्याड बसुनियां रडतां पोरें ?
पुरुषार्थ नव्हे पडणें रखडत ! १२

संघशक्तिच्या भुईंत खंदक
रुंद पडुनि शें तुकडे झाले,
स्वार्थानपेक्ष जीवीं अपुले
पाहिजेत ते सत्वर भरले—
घ्या त्यांत उड्या तर बेलाशक ! १३

धार धरिलिया प्यार जिवावर
रडतिल रडोत रांडा पोरें,
गतशतकांचीं पापें घोरें
क्षालायाला तुमचीं रुधिरें
पाहिजेत रे ! स्त्रैण न व्हा तर ! १४

जाऊं बघतें नांव लयाप्रत,
तशांत बनलां मऊ मेंढरें,
अहह ! घेरिलें आहे तिमिरें,
परंतु होऊं नका बावरे;
धीराला दे प्रसंग हिंमत ! १५

धर्मांचें माजवूनि डंबर
नीतीला आणिती अडथळे,
विसरुनियां हें जातात खुळे,
नीतीचें पद जेथें न ढळे
धर्म होतसे तेथेंच स्थिर. १६

हल्ला करण्या तर दंभावर-तर बंडांवर,
शूरांनो ! या, त्वरा करा रे !
समतेचा ध्वज उंच धरा रे !
नीतीची द्वाही पसरा रे !
तुतारिच्या ह्या सुराबरोबर ! १७

नियमन मनुजासाठीं, मानव
नसे नियमनासाठीं जाणा;
प्रगतिस जर तें हाणी टोणा,
झुगारूनि तें देउनि बाणा
मिरवा निज ओजाचा अभिनव ! १८

घातक भलत्या प्रतिबंधांवर
हल्ला नेण्या करा त्वरा रे !
उन्नतिचा ध्वज उंच धरा रे !
वीरांनो ! तर पुढें सरा रे-
आवेशानें गर्जत 'हर हर !' १९

पूर्वीपासुनि अजुनि सुरासुर
तुंबळ संग्रामाला करिती;
सम्प्रति दानव फार माजती,
देवांवर झेंडा मिरवीती !
देवांच्या मदतीस चला तर ! २०

—केशवसुत

## ४६. डंका

तेजाचे तारे तुटले, मग मळोचि सगळे पिकले !
लागती दुहीच्या आगी राष्ट्राच्या संसाराला;
अति महामूर पुर येतो ढोंग्यांच्या पावित्र्याला;
खडबडाट उडवी जेव्हां कोरड्या विधींचा मेळा;
चरकांत मान्यवर पिळती
सामान्य मुकी जनता ती,
लटक्याला मोलें येती,
कौटिल्य स्वैर बोकाळे ! तेजाचे तारे तुटले !

आचारविचारौघाचा नव नित्य रक्तसंचार
ज्या समाजदेहीं होता अनिरुद्ध करित व्यापार,
त्या देहा ठायीं ठायीं धट कसले बंध अपार
कोंडिलें स्वार्थकोंड्यांत,
जल सडलें तें निभ्रान्त,
तरि धूर्त त्यांस तीर्थत्व
देउनी नाडिती भोळे ! तेजाचे तारे तुटले !

कर्तव्य आणि श्रेयाची हो दिशाभूल जेव्हां ती,
आंधळा त्याग उपजोनी डोहळे भिकेचे पडती;
आतिरेके पूज्यभावाचे फुंकिती विवेकज्योति;
मग जुन्या आप्तवाक्यातें
भलतिशीच महती येते,
राणीची दासी होते,

बुद्धीचे फुटती डोळे ! तेजाचे तारे तुटले !

घन तिमिरीं घोर अघोरी विक्राळ मसण जागविती;
ती ‘ परंपरा आर्यांची ’ ‘ संस्कृती,’ ‘ शिष्टरूढी ’ ती;
‘ धर्मादि ’ प्रेत झाल्यांचीं बेफाम भुतें नाचविती;
हीं दंगल जेव्हां होते,
नाकळेचि कोठुन कीं तें,
येतात बंडवाले ते,
जग हाले, ‘ स्वागत ’ बोले ! तेजाचे तारे तुटले !

या बड्या बंडवाल्यांत ‘ ज्ञानेश्वर ’ मानें पहिला;
मोठ्यांच्या सिद्धान्तांचा घेतला पुरा पडताळा;
डांगोरा फोलकटाचा पिटविला अलम् दुनियेला;
झुंजोनी देवां दैत्यां
‘ अमृता ’ माधिं न्हाणी जनता;
उजळिला मराठी माथा;
सत्तेचे प्रत्यय आले ! तेजाचे तारे तुटले !

हिमतीनें अपुल्या प्रान्तीं उत्क्रान्ति शान्तिमय केली;
प्रेमाच्या पायावरतीं समतेचि इमारत रचली,
अंगची करामत ज्यांनीं ‘ खल्विदा ’ समर्पण केली;
ढाळिले अश्रु जे त्यांनीं,
सागरांबर-स्त्री-धरणी
निज उदरीं या चौघांनीं
आहेत जतन ते केले, तेजाचे तारे तुटले !

लागला वार अंगाला, रंगला यशानें त्याचे;
घांसला साहणेवरती, ओकला लोळ आगीचे;
जाळिला तदा गंधानें, भेदिले रेणु वायूचे;
आम्ही त्या दिल्जानांचे
साथी—ना मेलेल्यांचे,
हे डंके झडती त्यांचे,
ऐकोत कान असलेले ! तेजाचे तारे तुटले !

—बी



## ४७. रुद्रास आवाहन

डुम्‌डुमत डमरु ये, खण्‌खणत शूल ये,
   शंख फुंकीत ये, येइं रुद्रा !
प्रलयघनभैरवा, करित कर्कश रवा
   क्रूर विक्राळ घे क्रुद्ध मुद्रा   ध्रु०

कडकडा फोड नभ, उडव उडुमक्षिका;
खडबडवि दिग्गजां, तुडव रविमालिका;
मांड वादळ, उधळ गिरि जशी मृत्तिका
   खवळवीं चहुंकडे या समुद्रां !   १

पाड सिंहासनें दुष्ट हीं पालथीं,
ओढ हत्तीवरुनि मत्त नृप खालती,
मुकुट रंकास दे करटि भूपाप्रती
   झाड खट्‌खट तुझें खड्ग क्षुद्रां !   २

जळ तडागीं सडे, बुडबुडे, तडतडे
' शान्ति ही ! ' बापुडे बडबडति जन-किडे !
धडधडा फोड तट, रुद्र ! ये चहुंकडे,
   धगधगित अग्निमाधिं उजळ भद्रा !   ३

पूर्वि नरसिंह तूं प्रगटुनी फाडिले
दुष्ट जायिं अन्य गृहिं दरवडे पाडिले,
बनुनि नृप, तापुनी चंड, जन नाडिले
   दे जयांचें तयां वीरभद्रा !   ४

—भा. रा. तांबे



## ४८. नवा शिपाई

नव्या मनूंतिल नव्या दमाचा शूर शिपाई आहें,
कोण मला वठणीला आणूं शकतो तें मी पाहें !
ब्राह्मण नाहीं, हिंदुहि नाहीं, न मी एक पंथाचा,
तेच पतित कीं जे आंखडिती प्रदेश साकल्याचा !
खादाड असे माझी भूक,
चतकोरानें मला न सूख;
कूपांतिल मी नच मंडूक;
मळ्यास माझ्या कुंपण पडणें अगदीं न मला साहे !
कोण मला वठणीला आणूं शकतो तें मी पाहें ! १

जिकडे जावें तिकडे माझीं भावंडें आहेत,
सर्वत्र खुणा माझ्या घरच्या मजला दिसताहेत;
कोठेंही जा–पायांखालीं तृणावृता भू दिसते,
कोठेंही जा–डोईवरतें दिसतें नीलांबर तें;
सांवलींत गोजिरीं मुलें,
उन्हांत दिसती गोड फुलें,
बघतां मन हर्षून डुलें;
तीं माझीं, मी त्यांचा,–एकच ओघ अम्हांतुनि वाहे !
नव्या मनूंतिल नव्या दमाचा शूर शिपाई आहें ! २

पूजितसें मी कवणाला ?–तर मी पूजीं अपुल्याला,
आपल्यामधें विश्व पाहुनी पूजीं मी विश्वाला;
'मी' हा शब्दच मजला नलगे; संपुष्टीं हे लोक
आणुनि तो, निजशिरीं ओढिती अनर्थ भलते देख !

लहान-मोठें मज न कळे,
साधु-अधम हें द्वयहि गळे,
दूर-जवळ हा भाव पळे;
सर्वच मोठें-साधु-जवळ, त्या सकलीं मी भरुनी राहें !
कोण मला वठणीला आणूं शकतो तें मी पाहे ! ३

हलवा करितां तिळांवर जसे कण चढती पाकाचे,
अहंस्फूर्तिच्या केन्द्राभवतें वेष्टन तेंवि जडाचें;
आंत समाचि निर्गुण तिलक, वरी सदृश सगुण तो पाक,
परि अन्या बोंचाया धरितो कांटे कीं प्रत्येक !
अशी स्थिती ही असे जनीं !
कलह कसा जाइल मिटुनी ?
चिंता वागे हीच मनीं.
शान्तीचें साम्राज्य स्थापूं बघत काळ जो आहे,
प्रेषित त्याचा नव्या दमाचा शूर शिपाई आहें ! ४

—केशवसुत



## ४९. माझ्या जन्मभूमीचें नांव

सृष्टी तुला वाहुनी धन्य ! माते, अशी रूपसम्पन्न तूं निस्तुला
तूं कामधेनू ! खरी कल्पवल्ली ! सदा लोभला लोक सारा तुला;
या वैभवाला तुझ्या पाहुनीया, मला स्फूर्ति नृत्यार्थ होते जरी,
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मीं न कोठें तरी !
माते ! महात्मे तुझे, तत्त्ववेत्ते, तुझे शूर योद्धे, तुझे सत्कवि,
श्रेणी ययांची सदा माझिया गे मना पूजनीं आपुल्या वांकवी !
यांचीं यशें ज्या नव्या सद्गुणांना मला अर्पिती, ध्येय ते गे जरी,
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मीं न कोठें तरी !
तूझ्या महोदार सारस्वताच्या महासागरींचा जरी मीन मी
झालों, तरी गे तृषा मन्मनाची कधींही कधींही न होणें कमी !
आई ! गुरुस्थान अन्तीं जगाचें तुझें ! यांत शंका न कांहीं जरी
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मीं न कोठें तरी !
वारा तुझ्या स्पर्शनें शुद्ध झाला मला लाधला ! भाग्य हें केवढें !
माते ! स्वयें देशि जें अन्नपाणी, सुधा बापुडी कायशी त्यापुढें !
तूं बाळगीशी मला स्कन्धि अङ्कीं ! सुखाची खरी हीच सीमा पुरी !
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी, तसें पाहिलें मीं न कोठें तरी !
सामर्थ्य नामीं तुझ्या हें मला जें दिसे प्रेमयोगें अगे हिंदभू,
तें पूर्णतेला झणीं प्राप्त व्हावें ह्मणोनी करी योजना ही प्रभू;
रोवी तुला आंग्लभूपालकाच्या किरीटामधें कीं तुझी उन्नति
व्हावी खरी, तूं जगत्कारणाची पुरी ओळखीं प्रेमयुक्ता मति.

—टिळक



## ५०. महाराष्ट्र-लक्ष्मी

महाराष्ट्र-लक्ष्मी मातें जगीं धन्य वाटे,
यशोगीत तीचें गातां मनीं हर्ष दाटे. ध्रु०

पुनः पुन्हां परचक्रानें ताडिली बिचारी,
दीर्घ काल खचली होती पारतंत्र्यभारीं,
द्वादशाब्द दुष्काळानें जाहली भिकारी,
संकटांत तीच म्हणोनी करी उंच माथें. १

मावळांत वास, न ठावें जयां बाह्य वारें,
नेमधर्म ज्यांचे लोकीं कृषीकर्म सारें,
विळाकोयतींच जयांचीं काय तीं हत्यारें,
तेच वीर बनले समयीं मावळे मराठे. २

नये नीट धरितां ज्याला लेखणी करांनीं,
कृपादृष्टि संपत्तीची न ज्याचे ठिकाणीं,
परी यवनसत्तेची जो करी धूळधाणी,
कोण तया शिवरायाच्या पावला यशातें? ३

साधुसंत झाले, असती, तयांची न वाण,
मात्र रामदासा लाधे समर्थाभिमान,
जो मनीं स्वदेशहितार्चे धरोनी निशाण,
ध्वजा कौपिनाची मिरवी भारतांत थाटें. ४

कढीभातखाऊ म्हणती ब्राह्मणा जगांत,
ढिली कांस ज्यांची म्हणुनी हांसती, हंसोत,
तयांनींच करणी केली प्रसंगीं अचाट,
खोल गढे परसत्ता ती ढासळली जेथें. ५

पूर्व दिव्य ज्यांचें, त्यांना रम्य भाविकाळ,
बोध हाच इतिहासाचा सदा सर्वकाळ,
कासया वहावी चिंता मनीं मग जहाल,
रात्र सरे तेव्हां उगवे दिनहि पूर्ववाटे. ६

—विनायक



## ५१. महारथी

तुझ्यासम महारथी बघुन एकला निष्क्रिय,
अहर्निश मला गड्या, परम दुःख हो विस्मय;
पुढें रथ विलोलसा, सुखद, दिव्य संसार हा !
पहा, न मुनिसारखा जगिं उगा बसोनी रहा.

बनेन तव सारथी तुज जपेन जीवापरी,
असो सरल मार्ग, वा गिरि असो, असो वा दरी;
जगज्जनकयोजना, तशि मदीय उद्योगिता
रथा सबल अश्विनी, करुं नको विलंबा अतां !

पहा 'इह' 'परत्र' हीं उभय रम्य चक्रें किती !
न केवळ विभूषणें, परि रथास देती गति;
सदा तुजपुढें उभा जुळुन मी करां सारथी,
त्यजून भय, हो पुढें ! धर बघूं सुवीरा धृति !

तुला मृदु विशेषणीं कवि सदैव संबोधिती,
म्हणून दिसतें मला तवहि भीरु झाली मति;
पुरे ! त्यजुनि मोह हा समजुनी स्वरूपा निजा
स्वकार्यरत हो बघूं ! अनुग सारथी मी तुझा !

—टिळक



## ५२. स्त्री आणि पुरुष

फुलल्लीं फुलें— त्यायोगें उपवन खुललें.
दरवळला— परिमल सुखवाया सकला.
स्वैरगती— अलिगण उडती-बागडती.
मधुनादें— गाती प्रभुगुण आनंदें.
मंदगती— स्त्री तेथें हिंडत होती.
विचराया— पुरुषहि आला त्या ठायां.
कौतुकला— हंसला, बाग मनीं ठसला.
नव फुललें— पुष्प एक त्या आवडलें.
प्रेमभरें— खुडिलें तेणें तें स्वकरें.
हुंगियलें— चुंबियलें-माथां धरिलें.
क्षणमात्रें— होय नकोसें तें त्यातें.
कुसकरिलें— फेंकुनि धरणीवर दिधलें
सर्व कृती— स्त्री ती अवलोकित होती.
गहिंवरली— टिपें तिचीं टपटप गळलीं.
कां तीं ? तें— काय कथूं मी रासिकातें !

—विनायक



## ५३. दीपज्योतीस

सोन्याची तनु जाळितेस अपुली पाषाणमूर्तीपुढें,
मुग्धे ! तें वद कोण पुण्य तुझिया हातास तेणें चढे ?
सारें विश्व बुडे तमांत तिकडे भांबावुनी बापुडें,
गे ! निष्कंप, तुला परंतु इकडे, ही ध्यान-मुद्रा जडे.

घ्याया कोंडुनि मंदिरांत जगदुद्यानीं न तूं जन्मली,
वार्यां नासुनि जावया नुगवली बागेंत चांफेकळी !
व्हाव्या वर्धित वस्तु ज्यांत वसतें सौंदर्य अत्युत्कट,
इच्छा केवळ कीं ! न वस्तुसह तें पावो जगीं शेवट.

प्रत्यंगीं अवघ्या प्रकर्षभर ये ज्यांच्या पुरा मोडुन
त्यांच्या पूर्णपणास सुस्थिरपणा येथें न अर्धक्षण;
पूर्णोत्थापनकाल तोच पतनप्रारंभही होतसे,
ऐसा निष्ठुर कायदा-सकल या सृष्टीस शासीतसे !

येथें नूतनजीर्ण, रूप अथवा विद्रूप, नीचोत्तम,
न्यायान्याय, अनीतिनीति, विषयीं संभोग का संयम;
जातीं हीं भरडोनि एक घरटीं, एकत्र आक्रंदत,
आशा भीतिवशा म्हणूनिच मृषा स्वर्ग स्रजी शाश्वत.

हें वैषम्य असह्य ' होतसमयीं ' स्थापावया साम्यता,
तेजोवंत यदा यदा त्यजुनि ती प्रेतोपमा स्तब्धता;
अन्यायप्रतिकारकार्य करिती नाना प्रकारान्तरें,
दारीं बंड ! घरांत बंड ! अवघें ब्रह्मांड बंडें भरें !

हें लोकोत्तर रूप तेज तुजला आहे निसर्गें दिलें,
कीं तूं अन्य तशीच निर्मुनि जगा द्यावीस कांहीं फळें;
दानें दे न कुणा निसर्ग ! धन तो व्याजें तुम्हां देतसे,
तें त्याचें ऋण टाक फेडुनि गडे ! राजीखुशीनें कसें !

होतां वेल रसप्रसन्न फुटुनी येतो फुलोरा तिला,
ती आत्मप्रतिमांस निर्मुनि हंसे संहारकालानळा;
'वाढा आणि जगा' निसर्ग म्हणतो सृष्टीस भूतात्मिका,
डोळ्यांनीं उघड्या पहात असतां होशी गुन्हेगार कां ?

—बी



## ५४. कल्पकता

खा, पी, नीज, तसा उठूनि फिरुनी तें तेंच जा चिन्तित–
आवर्ती जग या ठरीव अपुल्या होतें हळू रांगत;
एका दुर्गम भूशिरावरि, परी देवी कुणी बैसली,
होती वस्त्र विणीत अद्‌भुत असें, ती गात गीतें भलीं. १

होते शोधक नेत्र, कर्णहि तिचे ते तीक्ष्ण भारी तसे,
होतें भाल विशाल देवगुरुनें पूजा करावी असें.
सूर्याचीं, शशिचीं सुरम्य किरणें घेऊनि देवी सुधी
होती गोवित, इंद्रचापहि तसें, त्या दिव्य वस्त्रामधीं; २

मेघांच्याहि छटा, तशीच कुटिला विद्युत्, तसे ते ध्वनि
लाटा, पाउस, पक्षि ते धबधबे–यांतें पटीं ती विणी;
तारांचें पडणें, तसें भटकणें केतुग्रहांचें; पहा,
सारें सुन्दर, भव्य, घेऊनि तिनें तें वस्त्र केलें अहा ! ३

आली भू कुतुकें तिथें तिस तिनें तें वस्त्र लेवीवलें;
तों त्या वृद्ध वसुंधरेवरि पहा ! तारुण्य ओथंबलें;
भूदेवी, मग हृष्ट होउनि मनीं, नाचावया लागली,
'आतां स्वर्ग मला स्वयेंच वरण्या येईल !' हें बोलली. ४

—केशवसुत



## ५५. चांफा

चांफा बोलेना, चांफा चालेना,
चांफा खंत करी, कांहीं केल्या फुलेना. ॥ ध्रु० ॥

गेलें ‘ अंब्याच्या ’ बनीं
म्हटलीं मैनांसवें गाणीं
आम्हीं गळ्यांत गळे मिळवुन.

गेलें केतकीच्या बनीं
गंध दर्वळला वनीं
नागासवें गळालें देहभान.

आलें माळ सारा हिंडुन
हुंबर पशूंसवें घालुन
कोलाहलानें गलबलें रान.

कडा धिप्पाड वेढी
घाली उड्यावर उडी
नदी गर्जुन करी त्रिहरण.

मेघ धरूं धांवे
वीज चटकन लवे
गडगडाट करी दारुण.

लागुन कळिकेच्या अंगा
वायु घाली धांगडधिंगा
विसरुनी जगाचें जगपण.

सृष्टि सांगे खुणा
आम्हां मुखस्तंभ राणा
मुळीं आवडेना ! रे आवडेना !

चल ये रे ये रे गड्या !
नाचूं उडूं घालूं फुगड्या,
खेळूं झिम्मा झिम्-पोरी झिम्-पोरी झिम् !

हें विश्वाचें आंगण
आम्हां दिलें आहे आंदण;
उणें करूं आपण दोघेजण.

जन विषयाचे किडे,
यांची धांव बाह्याकडे,
आपण करूं शुद्ध रसपान.

'दिठीं दीठ' जातां मिळून
गात्रें गेलीं पांगळून,
अंगीं रोमांच आले थरथरून.

चांफा फुलीं आला फुलून,
तेजीं दिशा गेल्या आटून,
कोण मी–चांफा? कोठें दोघेजण!

—बी



## ५६. शब्द

शब्द बापडे केवळ वारा। अर्थ वागतो मनांत सारा;
नीट-नेटका शब्द-पसारा। अर्थाविण पंगू. १

मनामनांचा संगम झाला। हृदया हृत्संदेश मिळाला;
शब्द बोबडा अपुरा पडला। निरुपम घे गोडी. २

शुद्धाशुद्धाकडे बघावें। वैय्याकरणीं शब्द छळावे;
शुष्कबंधनीं कां गुंतावें। प्रेमळ हृदयांनीं ? ३

व्याकरणाचे नियम कशाला। कोण मानतो साहित्याला ?
उठला जो हृदयास उमाळा। हृदयीं त्रिरमात्रा. ४

सुंदर वाक्यें शब्द मनोहर। सरस्वतीचे मंजुळ नूपुर;
ऐकायातें हटून अंतर। बसो पंडितांचें ! ५

ममतेचे दो घांस घ्यावया। प्रेमरसाचे घुटके प्याया;
उत्कंठित-उत्सुक त्या हृदयां। काय होय त्यांचें ? ६

अशुद्ध वाक्यें, शब्द मोडके। अवाच्य अक्षर, वर्ण तोटके;
गोड जसे अमृताचे भुरके। होती प्रीतीनें. ७

—वसंत

## ५७. झपूर्झा !

हर्षखेद ते मावळले,
हास्य निमालें,
अश्रु पळाले;
कण्टकशल्यें बोथटलीं,
मखमालीची लव वठली;
कांहीं न दिसे दृष्टीला
प्रकाश गेला,
तिमिर हरपला;
काय म्हणावें या स्थितिला ?–
झपूर्झा ! गडे झपूर्झा ! १

हर्षशोक हे ज्यां सगळें,
त्यां काय कळे ?
त्यां काय वळे ?
हंसतिल जरि ते आम्हांला,
भय न धरूं हें वदण्याला:–
व्यर्थी अधिकाचें अर्थ वसे,
तो त्यांस दिसे,
ज्यां म्हणति पिसे;
त्या अर्थाचे बोल कसे ?–
झपूर्झा ! गडे झपूर्झा ! २

ज्ञाताच्या कुंपणावरून,
धीरत्व धरून,
उड्डाण करून,
चिद्‌घनचपला ही जाते,
नाचत तेथें चकचकते;
अंधुक आकृति तिस दिसती,
त्या गाताती
निगूढ गीती;
त्या गीतींचे ध्वनि निघती–
झपूर्झा ! गडे झपूर्झा ! ३

नांगरल्याविण भुई बरी
असे कितितरी;
पण शेतकरी
सनदी तेथें कोण वदा !–
हजारांतुनी एखादा !
तरी न, तेथुनि वनमाला
आणायाला,
अटक तुम्हांला;
मात्र गात हा मंत्र चला–
झपूर्झा ! गडे झपूर्झा ! ४

पुरुषाशीं त्या रम्य अति
नित्य प्रकृति
क्रीडा करिती;

स्वरसंगम त्या क्रीडांचा
ओळखणें, हा ज्ञानाचा
हेतु; तयाची सुन्दरता
　　व्हाया चित्ता-
　　प्रत ती ज्ञाता,
वाडेंकोडें गा आतां-
झपूर्झा ! गडे झपूर्झा ! ५

सूर्य चन्द्र आणिक तारे,
　　नाचत सारे
　　हे प्रेमभरें
खुडित खपुष्पें फिरति जिथें;
आहे जर जाणें तेथें,
धरा जरा निःसंगपणा
　　मारा फिरके,
　　मारा गिरके,
नाचत गुंगत म्हणा-म्हणा
　　झपूर्झा ! गडे झपूर्झा ! ६

—केशवसुत



## ५८. ताजमहाल पाहिल्यावर

मानवधर्मा विसरविती । दिव्यगुणांतें चमकविती,
शिल्पकलेच्या या रीती । सौंदर्याच्या या स्फूर्ती;
मनांत असती,
जनांत दिसती,
स्वर्गी वसती,
स्वर्ग आणिती भूवरतीं । दिव्यपदा भू चढवीती. १

इह लोकाचा बंध तुटे । पार्थिवतेचा रंग विटे;
व्यंगपणाचा दोष फिटे । सान्ताचा परिवेष सुटे;
अनंत उमले,
अव्यक्त खुले,
अज्ञात कळे,
परिचित वस्तुक्रम उलटे । नवें विश्व, नव सत्य उठे. २

सौंदर्याच्या या मूर्ति । प्रसन्न काव्यें जीं रचिती;
चित्रें रंगीं रंगाविती । सत्याचीं रूपें असती;
मूळ स्फूर्ती,
एक प्रकृति,
निर्गुणवृत्ती,
सदानंदलहरी चित्तीं । उठती त्यांची ही व्यक्ती. ३

सर्व सृष्टिमधिं जें फिरतें । ब्रह्मकटाहीं जें घुमतें,
स्वर्गी जें जन्मा येतें । प्रलयीं विलया जें जातें,

निर्गुण हसतें,
सगुण विलसतें,
असतें नसतें,
नाचें सारें तें येथें । पाहे त्यासच तें दिसतें. ४

अमूर्त रूपा हें आलें । नव्हतें असतें तें झालें;
मनांत संकल्पीं उठलें । जनांत कृतिरूपीं वठलें;
हें प्रेमाचें,
हें प्रीतीचें,
परस्परांचें,
देणें येथें हें दिधलें । कुणीं म्हणावें तें फिटलें. ५

—बसंत



## ५९. काल, कीर्ति आणि विस्मृति

मातें भव्य अशी इमारत पुढें विच्छिन्न झाली दिसे,
'कोणाच्या करण्या चिरंतन यशा ही बांधियेली असे?'
काला प्रश्न विचारला; मज परी देतां न तो उत्तरा,
गेला पंख उभारुनी उडुनिया व्योमीं करोनी त्वरा!

'व्हावें स्मारक हें म्हणोनि कवणें प्रासाद हा बांधिला?'
केला प्रश्न असा मियां फिरुनिया देखोनिया कीर्तिला;
माझा प्रश्न तिनें तसा परिसिला, दुःखीं बुडाली सती;
वेगें निश्वसुनी बघे, निजमनीं लाजून ती खालतीं.

गेलों चालत मी तसाच पुढतीं, तों देखिली विस्मृति;
प्रासादावरतीं दिसे विरहतां स्वच्छंद गर्वे अती;
केला प्रश्न तिला न जों, मजसि दे ती सत्वरीं उत्तरा-
"पूर्वी बांधियला कुणास्तव असो, तो आज माझा खरा!"

—माधवानुज



## ६०. लोकमान्य टिळकांची भूपाळी

जय जय टिळका, अपर समर्था, धीरा, धीभास्करा,
शुभकरा ! धीरा, धीभास्करा !
मायभूमि ही करित आज तव जन्मोत्सव साजरा. ध्रु०

टिळक नव्हे, हें श्रीगीतेचें हृदय प्रकट जाहलें;
ज्ञानमय, हृदय प्रकट जाहलें;
कर्मयोग तो शिकवायाला आर्यजनीं धांवलें. १

कार्यकुशलता, नीतिचतुरता, श्रीहरिची जन्मते
टिळकमिष, श्रीहरिची जन्मते,
विघ्नांशीं झुंजते, मांडिते डावावरि डाव ते. २

जनभाग्यांतुन हिमालयांतुन गंगौघच हा पुढें,
धांवला गंगौघच हा पुढें,
राष्ट्रिय दुर्गुण धूत चालला मोक्षसागराकडे. ३

परमेशाचा जाहिरनामा टिळकरूप लागला,
वाचला, टिळकरूप लागला,
" प्रभुवर भूवर येईल आतां दीनांच्या पालना. " ४

विद्वत्तेच्या अंकावरतीं देशभक्ति खेळते,
टिळक ही देशभक्ति खेळते,
बंधुप्रीती गीतें गाते, समता ती डोलते. ५

पूत ध्येय तें, पूत कार्य तें, त्वदाचार पूत तो,
मूर्त तो, त्वदाचार पूत तो,
स्वदेशमंगल मंगल हेतू हृदयिं तुझ्या नाचतो. ६

किती धन्यता, किती मान्यता, किती पूज्यता परा,
नर वरा ! कितीं पूज्यता परा;
स्वयं कीर्ति ती चामर ढाळी तुजवर ज्ञानेश्वरा ! ७

तव अनुशासन जनसंजीवन, सिंहासन तुज नसे,
फक्त तें, सिंहासन तुज नसे,
सार्वभौम भूपाल परी तूं जनादराचा असे. ८

तुझी योग्यता भारी भारी जनता ऐसें वदे,
विचारी, जनता ऐसें वदे;
असंख्य तरवारींचे मुजरे झडावेच तुजपुढें. ९

मुक्या मनानें किति उधळावे शब्दांचे बुडबुडे,
तुझ्यावर, शब्दांचे बुडबुडे;
तुझे पवाडे गातिल पुढती तोफांचे चौघडे. १०

कुशल असो हा, विजयि असो हा, टिळक जगन्नायका !
आयका, टिळक जगन्नायका !
प्रभु, या एका खांबावर उभि महाराष्ट्रद्वारका. ११

—गोविंद



## ६१. जय वाल्मीकि !

जय वाल्मीकि ! तुज हें तर्पण;
तव चरणीं सर्वस्वसमर्पण ! ध्रु०
त्रिभुवनपति जो रामरघूत्तम,
सुरनरकिन्नरनुत पुरुषोत्तम,
हे वाङ्मयतरुकोकिल निरुपम,
त्या रामा तूं देशि रामपण. १
विधिहि शकेना द्याया कवणा,
ती दश वदनें देशि रावणा;
राम यमाधिप दे ज्या मरणा,
अमर करिशि तो सुरारि रावण. २
अधनांचें धन, अबलांचें बल,
अमङ्गळांचें श्रेयोमङ्गल,
जन्मान्धांचें लोचन निर्मल,
दुर्वृत्तांचें दुरितनिवारण. ३
हात दिला तूं किति बुडत्यांना !
धीर दिला किति तूं व्यथितांना !
उरीं लाविलें किति पतितांना !
जय भवनाविक पतितोद्धारण ! ४
कालाच्या अति कराल दाढा
सकल वस्तुंचा करिति चुराडा,
कालशिरिं झडे तुझा चौघडा,
जय मृत्युञ्जय ! जय कविभूषण ! ५

—भा. रा. तांबे



## ६२. श्रीकृष्णजन्मोत्सव

उठा कवींनों ! निज दिव्याचा निधि उघडा काव्याचा !
सुमंगलाचा आज सुखाचा जन्मोत्सव कृष्णाचा. १

प्रतिभेचा कल्पद्रुम फुलवा, फुलवुन जगभर हलवा,
सुकल्पनांनीं सुभग सुमांनीं विश्वमंदिरा खुलवा. २

ताऱ्यांची, दीपांचि, सुमांची सुप्रभ काढा रास,
हास्याची सरीस होऊं द्या गमतीची आरास. ३

चमत्कृतीची, चतुराईची, अभूत उल्हासाची,
नवलपणाची नवी होउं द्या रोशनाइ नवलाची. ४

शृंगाराचा, नव रंगाचा सर्वां सजवा साज;
सौंदर्याला आज होउं द्या सृष्टीचा अधिराज. ५

अधिराजाची सौंदर्याची भू अधिराज्ञी आज,
नव शोभेची कवि काव्याची जिकडे तिकडे मौज. ६

जगाएवढा, नभाएवढा, मनाएवढा व्हावा ?
विश्वंभर तो असे केवढा ? नसे कुणाला ठावा. ७

अनंत भगवान्, अनंत श्रीमान्, अनंत विभु समजावा;
त्या विभुच्या विभवा शोभावा ऐसा उत्सव व्हावा. ८

आर्यभूमिला नंदन झाला, आर्यांना आनंद;
मला आवडे तो आर्यांचा सदानंद गोविंद. ९

× × × × ×

अंधारानें अधिक पेटती, सूर्यानें जे विझती,
ते ताऱ्यांचे दीप पेटवुन ठेवा गगनावरतीं. १०

दीप कशाचे ! त्या ताऱ्यांच्या हौसेच्या मौजेच्या
नभांत लावा जळत्या झुलत्या हंड्या जणुं काचेच्या. ११

हंड्यांच्या झुबक्यामधिं ठेवा झुंबर हें चंद्राचें;
हंड्या झुंबर, शोभा सुंदर, गगन दिसे गमतीचें. १२

नच भडके, नच विझे वायुनें ऐशा परिनें लावा;
सूर्याचा तेजोमय भपका रात्रीं वरतीं ठेवा. १३

त्या तेजाच्या कल्लोळें नच बाळकृष्ण दचकावा;
वीजेचा चमचमाट म्हणुनी सावकाश लावावा. १४

दीपोत्सव हा, प्रेमोत्सव हा प्रेमें देवां पावो;
धर्मरक्षणीं युगायुगांनीं धर्मेश्वर तो येवो. १५

जन्मोत्सव हा आज अजाचा, अजराचा, अमराचा;
किंवा स्वदेशस्वातंत्र्याच्या विजयाच्या समराचा. १६

संतभक्तिला नंदन झाला, संतांना आनंद;
मला आवडे तो संतांचा सदानंद गोविंद. १७

—गोविंद



## ६३. सिंहावलोकन

मुखा फिरवुनी, जरा वळुनि पाहतां मागुती,
कितीक हृदयें वदा चरकल्याविणें राहती ?
' नको वळुनि पाहणें ! ' म्हणुनि दृग् जरी आवरूं,
धुकें पुढिल जाणुनी मन न घे तसेंही करूं ! १

प्रदेश किति मागुते रुचिर ते बरें टाकिले,
कितीक तटिनीतटें, श्रम जियें अम्हीं वारिले;
किती स्मृतिस धन्यतास्पद वनस्थली राहिल्या.
जियें धवलिता निशा प्रियजनांसवें भोगिल्या ! २

सुखें न मिळतील तीं फिरुनि !—तीं जरी लाविती
मनास चटका, तरी नयन त्यांवरी लोभती.
परन्तु हृदयास जे त्वरित जाउनी झोंबती,
प्रमाद दिसतां असे नयन हे मिटूं पाहती !—

किती घसरलों !—किती चुकुनि शब्द ते बोललों !—
करूनि भलतें किती पतित हंत ! हे जाहलों !
स्वयें बहकुनी उगा स्वजनमानसें टोंचिलीं !—
वृथा स्वजनलोचनीं अहह ! आंसवें आणिलीं ! ४

चुकोनि घडलें चुको, परि ' असें नव्हे, हें बरें '
वदूनिहि कितीकदां निजकरोंचि केलें बरें !
म्हणूनिच अम्हांपुढें घनतामिस्र सारें दिसे,
पुढें उचलण्या पदा धृति मुळींहि आम्हां नसे ! ५

' चुकी भरुनि काढणें फिरुनि, हें घडेना कधीं; '
विनिष्ठुर असें भरे प्रगट तत्त्व चित्तामधीं !
म्हणूनि अनिवार हें नयनवारि जें वाहतें,
असे अहह ! शक्त का कवणही टिपायास तें ? ६

—केशवसुत



## ६४. जन पळभर म्हणतिल, ‘ हाय हाय ! ’

जन पळभर म्हणतिल, ‘ हाय हाय ! ’
मी जातां राहिल कार्य काय ? ध्रु०

सूर्य तळपतिल, चन्द्र झळकतिल,
तारे अपुला क्रम आचरतिल,
असेच वारे पुढें वाहतिल,
होईल कांहिं का अन्तराय ! १

मेघ वर्षतिल, शेतें पिकतिल,
गर्वानें या नद्या वाहतिल,
कुणा काळजी कीं न उमटतिल
पुन्हां तटावर हेच पाय ? २

सखेसोयरे डोळे पुसतिल,
पुन्हां आपल्या कामिं लागतिल,
उठतिल, बसतिल, हसुनि खिदळतिल,
मी जातां त्यांचें काय जाय ! ३

रामकृष्णही आले, गेले !
त्यांविण जग का ओसचि पडलें ?
कुणी सदोदित सूतक धरिलें ?
मग काय अटकलें मजशिवाय ? ४

अशा जगास्तव काय कुढावें ?
मोहिं कुणाच्या कां गुंतावें ?
हरिदूता कां विन्मुख व्हावें ?
कां जिवुं नये शान्तींत काय ? ५



—भा. रा. तांबे

## ६५. नवें पान उघडलें !

होती सृष्टि कुठें ? उजेड अथवा अंधार होता कुठें ?
होता मात्र तदा जगज्जनक तो, हा काळ होता कुठें ?
कोणी कांहिं कुठें कधींहि नव्हतें, तेव्हां जगन्नायक
इच्छासाधन घेउनी बनविता झाला महापुस्तक. १

कोरें पुस्तक निर्मिलें प्रथम जें, आकाश ज्या बोलती,
नाना तारकपुंज आंत लिहिले त्यांची न कोणा मिती;
येथें काढियलीं यथाक्रम तरू, पक्षी, पशू, माणसें.
"होवो हें" म्हणतांच तें उमटलें जागीं जसेंच्या तसें. २

झालें पुस्तक पूर्ण, विश्व म्हणतों ज्याला इथें आपण;
वाचाया बसला प्रभू, उलटितो पानें स्वयें वाचुन;
त्यानें आजवरी किती उलटिलीं पानें तया ठाऊक,
जाणे तोच पुढील यांत उरलीं पानें किती आणिक. ३

जन्मापासुन पाहिलीं वरवरीं तेवीस पानें पुरीं;
कोणा माहित आणखी किति तरी पाहीन या भूवरीं ?
दृष्टीदेखत आज पान सरलें, आलें नवें बाहिर;
जाणूं काय अम्ही शुभाशुभ किति वाचील तो यावर ? ४

—दत्त



## ६६. स्मृति-चित्र

स्मरतो मज तो प्रसंग अजुनी दिन बहु झाले जरी;
नको तें स्मरण तयाचें परी ! ध्रु०

बाळपणीं मी सहज मजेनें गेलों एक्या दिनीं
फिराया स्वच्छंदें उपवनीं.
दिसली तेव्हां प्रभातवेळा प्रसन्न नयनां किती,
विहंगम मंजुल आलापिती.
दिनकरसंगें दिसे रंगली पूर्वदिशा सुंदरी
लोचना रूप जयेचें हरी.
झाल्या कुसुमित नाना लता
होता मंदानिल वाहता
परिमलपूरित, सेवुनि ज्यातें मन मोदातें वरी. १

उद्यानीं मी वेंचित असतां प्रफुल्ल सुंदर फुलें
सहसा एक नरा देखिलें.
उग्र तयाचें रूप पाहुनी उपजे भीती मनीं;
सुटला कंप शरीरा झणीं.
पाहुनि मातें वदे, ' बालका, मज भीसी कासया
हें घे पुस्तक खेळावया '.
ऐसें सस्मित वच बोलुनी
हस्तीं पुस्तक मम देउनी
दृष्टिपुढुनि मम नर तो झाला अंतर्हित सत्वरी. २

रम्य रेखिलीं होतीं चित्रें पशुपक्ष्यांचीं बरीं.
   मुद्रिलें होतें हैमाक्षरीं.
आशा, विभव, प्रीति, संपदा यांवर होते धडे
   पुस्तकीं लिहिलेले रोकडे.
हर्षभरें मी नाचत गेलों सदनातें घेउनी,
   त्याजला नीट दिलें ठेवुनि.
   गेले वत्सर कांहीं पुढें;
   दृष्टिस एके दिवशीं पडे;
पुस्तक तें मी औत्सुक्यानें धरिलें अपुल्या करीं. ३

सुरम्य चित्रें कुरूप दिसलीं गेलीं तीं अक्षरें
   मागें पुस्तक कोरें उरें.
आशा, विभव, प्रीति, संपदा सुदिव्य यांचे धडे
   गेले विलयाला बापुडे.
एकवार जें कारण झालें सुखवाया लोचनां
   उपजवी उलटी तें भावना.
   झालों खिन्न बहू मी मनीं;
   बोललों आणुनि जल लोचनीं;
क्रूरा काळा असे तुझी ही कठोर करणी खरी ! ४

असती बाल्यीं उड्या मनाच्या उंच अहाहा किती !
   बेतही नित्य नवे चालती.
वाटे विक्रम करुनि कीर्तितें वरुनी आणूं घरा;
   इंदिरा सकल सुखाचा झरा.

सकल जगातें वदावयातें लावूं कीं हा खरा
  जन्मला धन्य जगीं मोहरा,
  जातां बाल्यदशा ती दुरी,
  उलटा अनुभव येई परी;
दुःख, निराशा यांचा पगडा बैसे हृदयावरी ! ९

—माधवानुज



## ६७. घुबड

श्यामा राणी गभीर रजनी,
अलंकृता जी नक्षत्रगणीं,
वेत्र आपुलें उंच धरोनी,
बसुनी राज्यासनीं दरारा दावित आहे जो फार,
समोरच्या चिंचेवरुनी तों
घुबड तियेचा बन्दीजन तो
घूघू-घूघू-महिमा तीचा वर्णी करुनी घूत्कार! १

कवी आपुल्या खिडकीमधुनी
बाहेर बघे शून्य लोचनीं—
स्तब्धत्व जनीं, स्तब्धत्व वनीं,
मनींहि दयितानिधनें वागे स्तब्ध निराशा अनिवार!
अवघड झालें एकलेपणें,
परि त्या तरुवरुनी घुबडानें
'ऊं हूं-मी तुज सोबत!' म्हटलें, 'घूघू' करुनि घूत्कार! २

"खाशी सोबत" कवी म्हणाला;
"माझ्या विरहव्यथित मनाला
वाटे मनुजांचा कंटाळा;
दुःख करित बैसणें आवडे, जेथें राहे अंधार!
हा मित्र मला भला मिळाला
धीर मदीय मना द्यायाला!"
"ऊं हूं-ऊं हूं!" उत्तर दिधलें त्यानें करुनी घूत्कार! ३

" नाहीं ? धीर न देशिल काय
शोकें मी मोकलितां धाय ?
ओढवलें कीं अदृष्ट हाय !
गुणरूपवती प्रिया निमाली ! झालें सारें निस्सार !
विलाप ऐसे ऐकुनि माझे
द्रवेल काय न बा हृदय तुझें ? "
"ऊं हूं–घूघू !" उत्तर बोले त्याचा भेसुर घूत्कार ! ४

" हे अप्रतिमे ! प्रिये प्रियतमे !
तुजवीण जिणें निर्माल्य गमे !
अहह ! वेढिलें असे मज तमें !
मरून तर मी, जेथ वसे ती दिवंगता दिव्याकार,
तेथ पूजिली सुरांगनांनीं
पाहिन काय न सखी स्वनयनीं ? "
"ऊं हूं–ऊं हूं !" बोले निष्ठुर त्या घुबडाचा घूत्कार ! ५

" बरें बरें !–मी नरकीं जाइन,
घोर यातना तेथिल सोशिन;
खेद न त्यांचा अगदीं मानिन;
जर त्या स्थानीं वागेल मनीं कान्तेचा पुण्याकार;
तेथ तियेचें घाया दर्शन
स्मृति मम समर्थ होइल काय न ? "
"ऊं हूं–घूघू !" बोले निर्घृण त्या दगडाचा घूत्कार ! ६

" जा निघ येथुनि, मला रडूं दे,
शोकें माझें हृदय कढूं दे !

कानीं परि तव रव न पडूं दे,
जो मम खिन्न मनावरि लादी निर्विण्णपणाचा भार !
डाग न देई मम दुःखावर,
काळें कर तूं येथुनि सत्वर ! "
"घूघू !–ऊं हूं !" दे प्रत्युत्तर त्या अधमाचा घूत्कार ! ७

निशीथसमयीं या अन्धारीं
वेताळाची मिरवे स्वारी,
पाजळूनियां टेंबे भारी
भुतें नाचती भयानकपणें !–चित्तीं उपजविती घोर !
नैराश्यें मज पुरें घेरिलें,
खिडकीपुढुनी घुबड न हाले,
घूघू–घूघू चाले त्याचा घूघू भीषण घूत्कार ! ८

—केशवसुत



## ६८. निज नीज माझ्या बाळा !

बा नीज गडे नीज गडे लडिवाळा !
निज नीज माझ्या बाळा ! ध्रु० ॥

रवि गेला रे सोडुनि आकाशाला,
धन जैसें दुर्भाग्याला.
अंधार वसे चोहिंकडे गगनांत,
गरिबाच्या जेविं मनांत.
बघ थकुनि कसा निजला हा इहलोक,
मम आशा जेविं अनेक.
खडबड हे उंदिर करिती,
कण शोधायातें फिरती,
परि अंतीं निराश होती;
लवकरि हेही सोडितील सदनाला,
गणगोत जसें अपणांला.

बहु दिवसांच्या जुन्या कुडाच्या भिंती;
कुजुनी त्यां भोकें पडती.
त्यांमधुनी त्या दाखविती जगताला
दारिद्र्य आपुलें बाळा.
हें कळकीचें जीर्ण मोडकें दार
कर कर कर वाजे फार;
हें दुःखानें कण्हुनि कथी लोकांला
दारिद्र्य आपुलें बाळा.

वाहतो फटींतुनि वारा;
सुकवीतो अश्रूधारा;
तुज नीज म्हणे सुकुमारा !
हा सूर धरी माझ्या या गीताला,
निज नीज माझ्या बाळा !

जोंवरतीं हें जीर्ण झोपडें अपुलें
दैवानें नाहीं पडलें,
तोंवरतीं तूं झोंप घेत जा बाळा;
काळजी पुढें देवाला !
जोंवरतीं या कुडींत राहिल प्राण,
तोंवरि तुज संगोपीन;
तदनंतरची करूं नको तूं चिंता;
नारायण तुजला त्राता.
दारिद्र्या चोरिल कोण ?
आकाशा पाडिल कोण ?
दिग्वसना फाडिल कोण ?
त्रैलोक्यपती आतां त्राता तुजला,
निज नीज माझ्या बाळा !

तुज जन्म दिला सार्थक नाहीं केलें;
तुज कांहिं न मीं ठेवीलें.
तुज कोणि नसे, छाया तुज आकाश;
धन दारिद्र्याची रास;

या दाहि दिशा वस्त्र तुला सुकुमारा !
गृह निर्जन रानीं थारा;
तुज ज्ञान नसे अज्ञानाविण कांहीं;
भिक्षेविण धंदा नाहीं.
तरि सोडुं नको सत्याला;
धन अक्षय तेंच जिवाला;
भावें मज दीनदयाळा;
मग रक्षिल तो करुणासागर तुजला.
निज नीज माझ्या बाळा !

—दत्त



## ६९. म्हातारी

घेउनि हृदयाशीं सुतेला, स्थित मी दाराशीं;
म्हातारी आली तरंगत, मुलगीला दिसली.
हात पुढें केले धराया तिला तिनें आपुले;
तिच्या शिरावरुनी तधीं ती गिरक्या घे उडुनी.

हांसत वरि करुनी हात, ती धरूं झटे फिरुनी;
त्या चलनें वरतीं उडाली म्हातारी परती.
खिदळत तें बघतां उडाया पाही मम दुहिता !
दडपण संसृतिचें निघालें मम चित्तावरचें;
मन्मनही लागे तरंगूं म्हातारीसंगें !
वारा तों तिजला लागला दूरच न्यायाला.
चुम्बुनि वत्सेला वदें मी मग म्हातारीला:—

" थांब, थांब ! जाशी अशा कां ! फिर, ये गे मजशीं;
वयस्कता माझी म्हणुनि जर करिसी इतराजी,
तर माझी सोनी पाहुनी ये गे परतोनी !
तुजला पाहूं दे तियेला, खिदळत राहूं दे !
मज वय विसरूं दे; मुग्ध मधु बाल्यीं उतरूं दे !
ते दिन पुष्पांचे, कोवळ्या किरणीं खेळाचे !
हे दिन–हाय !–
हे दिन–चिन्तांचे परन्तू लटिकें हंसण्याचे !
हे दिन........जाऊं दे
मला तुज गाणें गाऊं दे !

म्हणती म्हातारी तुज, कधीं होतिस तरुण परी !
तव जनि मृति न दिस, अजामर रूप तुझें भासे !
कोठुनि तूं यशी, न वदवे, कोठें तू जाशी;
स्वैरपणें भ्रमसी, यदृच्छा मूर्तच तूं गमसी !

येशी तू का गे यक्षिणीकुंजांतुनि ?—सांगें.
कैशा वागुनियां मिळविती अक्षय यौवन त्या;
झिजवित नित्य जिणें तयांला पडतें का मरणें ?
वद त्यांची रीती ध्यावया आम्ही लागूं ती.

वा गंधर्वांचें विमानच सूक्ष्मरूप साचें
वद असशी का तूं तरंगत वातावरणांतून् ?
सूक्ष्म देह धरुनी असति का तुजवरि ते बसुनी ?
दिव्य असें गाणें गात ते असतिल सौख्यानें;
तें मज पाप्याला कशाचें ये ऐकायाला !
परि मम वत्सेतें गमे तें परिसाया मिळतें;
म्हणुनिच उल्हासें अशी ही वेडावुनि हांसे !

अज्ञातामधला मूर्त तूं गमसी ध्वनि मजला;
अर्थ तुझा कोण मला तो देइल सांगोन ?
कळेल जर मज तो, तर जगीं भरला जो दिसतो—
मी तो अंधार लोपवूं झटेन साचार !

" खपुष्प तूं असशी काय गे ?- सांगुनि दे मजसी;
तुझे रंग वास न कळती मर्त्य मानवास,
जर ते कळतील तर इथें स्वर्गच होईल !
मग तुज धरण्यातें मुलांपरि मोठे झटातिल ते !

" स्वरूप सत्य तुझें मुळींही तें मजला नुमजे,
तरी तुझ्या ठायीं वसतसे अद्भुत तें कांहीं,
प्रत्यक्षांतुनि तें परोक्षीं शीघ्र मला नेतें,
तेथें स्वच्छंदें विचरतां मोद मनीं कोंदे,
मग गणमात्रांतें जोडणें केशवपुत्रातें."

—केशवसुत



## ७०. हतभागिनी

तळहातीं टेकुनी ही स्वशिरातें बैसली ! ध्रु०

मस्तकीं केश विखुरले,
श्वास चालले, अश्रु लोटले,
गळे जल गालीं—चिंतेनें पोळली ! १

वस्त्रें तीं अपुरीं जुनीं,
तेथ कोठुनी, असावा मणी,
दीनता ल्याली—दुःखानें कावली ! २

दारिद्र्य घरीं जागतें,
अन्न काय तें, दिसेना कुठें,
वायुजलवाली—गगनाची साउली ३

होती ती सिंहासनीं,
भाग्यशालिनी, धनी विजयिनी,
परी तिज खालीं—दुर्दैवें ओढिली. ४

एकाश्रुबिंदुकारणें
तियेच्या रणें झुंजलें मनें,
असे सुत व्याली—जयकालीं माउली. ५

कारटीं करंटीं तिथें,
निपजलीं भुतें ! मातृशोणितें–
स्वतांला लाली–आणाया धांवलीं ! ६

कल्याण काय नेणती,
नित्य भांडतीं, आपसांत तीं,
परां वश झालीं–स्वत्वाला विसरलीं. ७

गेले दिन यावे कसे,
वर्तनें असे, एकदां फसे–
गाय जी गाळीं–चेपत ती चालली ! ८

—विनायक



## ७१. सतारीचे बोल

काळोखाची रजनी होती
हृदयीं भरल्या होत्या खंती;
अंधारांतचि गढलें सारें
लक्ष्य, न लक्षी वरचे तारे;
विमनस्कपणें स्वपदें उचलित
रस्त्यांतुनि मी होतों हिंडत;
एका खिडकींतुनि सूर तदा
पडले-दिड दा, दिड दा, दिड दा! १

जड हृदयीं जग जड हें याचा
प्रत्यय होता प्रकटत साचा;
जड तें खोटें हें मात्र कसें
तें नकळे; मज जडलेंच पिसें.
काय करावें, कोठें जावें,
नुमजे मजला कीं विष खावें!
मग मज कैसे रुचतील वदा
ध्वनि हे-दिड, दिड दा, दिड दा? २

सोंसाट्याचें वादळ येतें
तरि तें तेव्हां मज मानवतें;
भुतें भोंवतीं जरि आरडतीं
तरि तीं खचिताचि मज आवडतीं;

कारण आंतिल विषण्ण वृत्ति
बाह्य भैरवीं धरिते प्रीति;
सहज कसे तिज करणार फिदा
रव ते-दिड दा, दिड दा, दिड दा ! ३

ऐकुनि ते मज जो त्वेष चढे,
त्यासरशीं त्या गवाक्षाकडे
मूठ वळुनि मीं हात हिसकिला;
पुटपुटलोंहि अपशब्दांला;
म्हटलें-" आटंप, आटप मूर्खा !
सतार फोडुनि टाकसी न कां !
पिरपिर कसली खुशालचंदा,
करिसी-दिड दा, दिड दा, दिड दा !" ४

सरलों पुढता चार पावलें,
तों मज न कळे काय जहालें;
रुष्ट जरी मी सतारीवरी
गति मम वळली तरि माघारी;
ध्वनिजालीं त्या जणूं गुंतलों
असा स्ववशता विसरुनि बसलों-
एका ओट्यावरी स्थिर तदा
ऐकत-दिड दा, दिड दा, दिड दा ! ५

तेथ कोंपरें अंकीं टेंकुनि
करांजलीला मस्तक देउनि

बसलों; इतुक्यामाजी करुणा—
रसपूर्ण गती माझ्या श्रवणां
आकृष्ट करी; हृदय निवालें,
तन्मय झालें, द्रवलें; आलें—
लोचनांतुनी तोय कितिकदां
ऐकत असतां—दिड दा, दिड दा! ६

स्कन्धीं माझ्या हात ठेवुनी
आश्वासी मज गमलें कोणी,
म्हणे—“ खेद कां इतुका करिसी ?
जिवास कां बा असा त्रासती ?
धीर धरीं रे !—धीरापोटीं
असतीं मोठीं फळें गोमटीं !
ऐक, मनींच्या हरितील गदा
ध्वनि हे—दिड दा, दिड दा, दिड दा!” ७

आशाप्रेरक निघूं लागले
सूर, तधीं मीं डोळे पुशिले;
वरतीं मग मी नजर फिरविली,
नक्षत्रें तों अगणित दिसलीं;
अस्तित्वाची त्यांच्या नव्हती
ह्या वेळवरी दादच मज ती!
“ तम अल्प—द्युति बहु ” या शब्दां
वदती रव ते—दिड दा, दिड दा! ८

वाद्यांतुनि त्या निघती नंतर
उदात्ततेचे पोषक सुस्वर;

तों मज गमलें विभूति माझी
स्फुरत पसरली विश्वामाजीं;
दिक्कालासहि अतीत झालों
उगमीं विलयीं अनन्त उरलों;
विसरुनि गेलों अखिलां भेदां
ऐकत असतां—दिड दा, दिड दा! ९

प्रेमरसाचे मधुर बोल ते
वाद्य लागतां बोलायातें,
भुललों देखुनि सकलहि सुन्दर;
सुरांगना तों नाचति भूवर.
स्वर्ग धरेला चुंबायाला
खालीं लवला—मजला गमला!
अशा वितरिती अत्यानंदा
ध्वनि ते—दिड दा, दिड दा, दिड दा! १०

शान्त वाजली गती शेवटीं;
शान्त धरित्री, शान्त निशा ती,
शान्तच वारें, शान्तच तारे,
शान्तच हृदयीं झालें सारें!
असा सुखें मी सदना आलों,
शान्तींत अहा! झोंपी गेलों;
बोल बोललों परी कितीकदां
स्वप्नीं—दिड दा, दिड दा, दिड दा! ११

—केशवसुत



## ७२. सुवास

हिंडत असतां निर्जन रानीं
स्वैरगतीनें गुंगत गाणीं,
मधुर सुवास घ्राणीं आला,
त्या योगानें आत्मा धाला.
उद्भवला हा परिमल कोठें?
पडलें मजला कोडें मोठें.
फिरलों—स्थिरलों ठायीं ठायीं,
मूळ तयाचें कळलें नाहीं.
कार्य आणि कारण या जगतीं,
तीच वस्तु नटलेली दिसती;
तैसें माझें मानस आतुर
शंका काढी—देई उत्तर. १

सुगंध जो का अंगीं दाटे,
पुष्पमिषें प्रकटावें त्यातें;
पुष्पें–ज्यांना नाहीं जोड.
रंगें, रूपें, वासें, गोड,
हुंगीना परि कोणी त्यांतें,
त्यांच्या आस्वादी न रसातें,
खेळावीं जीं रसिकाहातीं,
होते त्यांची संतत माती.
ओसाडींतील गुलाबातें
खिन्नपणा याकरितां वाटे.

टाकि उसासे सारा वेळ,
त्याचा हा का गंध असेल ? २

वागविली निज हृदयप्रांतीं
भक्तीनें रमणाची मूर्ती,
भजली अर्पण करुनी त्याला
प्रेमाच्या पुष्पांची माला.
काय होय तें परि पुरुषाला,
नव पुष्पावरच्या भ्रमराला ?
विमुख तिला तो हाय ! जहाला,
अंतरली स्त्री सर्वस्वाला.
बाला भग्नमनोरथ झाली,
मौक्तिकांपरी अश्रू ढाळी.
दुःखानें एकांतीं स्फुंदे,
काय तेंच या स्थानीं गंधे ? ३

मात्सर्याचा भरला वारा,
अहंपणाचा सर्व पसारा;
अज्ञानाची मिरवे द्वाही,
रसिकत्वाला थारा नाहीं.
काय अशा जनतेंत रहावें ?
काय पहावें ? काय चहावें ?
बरें राहणें निर्जन रानीं,
ओढ्यासंगें गाणें गाणीं;

यापरि वैतागून कवीनें,
ओसाडींत स्वच्छंदानें—
वाजविला जो सुस्वर पावा,
त्याचा का हा वास असावा? ४

परिमलकारण कळलें नाहीं,
उगमस्थल आढळलें नाहीं;
व्यर्थ हिंडलों झालों वेडा!
वेडा! वेडा! वेडा! वेडा!
परिमलकारण मजला कळतें,
उगमस्थळ किंवा आढळतें-
सांठवितों कवितेंत तयाला
वाग्देवीला सुखवायाला!
स्वानुभूत वासाचें दान
करावयाला जोंवर ये न,
तोंवर कवितालतिकेवरतीं
कर्णिकार सुमनांची भरती! ५

—विनायक



## ७३. हरपलें श्रेय

त्रिखंड हिंडुनि धुंडितसें,
न परि हरपलें तें गवसे ! ध्रु०

होत्यें अजाण माहेरीं
तों खेळ खेळल्यें परोपरी,
लुटुपटीच्या घरदारीं
लटकीच जाहल्यें संसारी;
तेव्हांचें सुख तें आतां
खऱ्या घरींहि न ये हातां !
चुकचुकल्यापरि
वाटे अन्तरिं,
होउनि बावरि
निज श्रेय मी पाहतसें,
न परि हरपलें तें गवसे ! १

'प्राप्त जाहलें तें तुजला
तूं मागितलें जें देवाला,
ज्याचें मोल तुवां दिधलें
तेंच तुझ्या पदरीं पडलें-'
या वचनें चुकला सौदा
उमगुनि हृदया दे खेदा !
दिलें हिरण्मय,
हातीं मृण्मय;
हा हतविनिमय !

परत मला मम मिळे कसें ?
न परि हरपलें तें गवसे ! १

किरण झरोक्यांतुनी पडे,
अणूंसवें त्यांतून उडे
परोक्षविषयीं मन माझें
विसरुनियां अवघीं काजें;
हयगय त्यांची मज जाची
परि न मला पर्वा त्याची !
वेडी होउन
बसल्यें अनुदिन
एकच घेऊन—
मज माझें लाभेल कसें ?
न परि हरपलें तें गवसे ! २

जेथें ओढे वनराजी
वृत्ति रमे तेथें माझी;
कारण कांहीं साक्ष तिथें
मम त्या श्रेयाची पटते;
म्हणुनी विजनीं मी जात्यें,
स्वच्छन्दें त्या आळवित्यें.
स्वभाव दावुनि
परि तें झटदिनिं
जाई लोपुनि !
मग मी हांका मारितसे !
न परि हरपलें तें गवसे ! ४

भीडभाड माझी फिटली,
जग म्हणतें कीं ‘ ही उठली ! ’
जनमर्यादा धरुनि कसें
अमर्याद तें मज गवसे ?
एक शब्द बोलेन जरी
सकलां कुण्ठित करिन तरी !
अशी आगळी,
परी बावळी,
आहें दुबळी;
कां कीं त्याविण सुचत नसे !
न परि हरपलें तें गवसे ! ५

स्वपतिचितेवरि उडी सती
संसृतिविमुखी घेई ती;
दीपशिखेवरि पतंग तो
प्रेमें प्राणाहुति देतो;
मी न करिन का तेंवि तधीं
माझें मज लाभेल जधीं ?
मजपासोनी
हाय ! हिरोनी
नेलें कोणीं !—
म्हणुनि जीव पाखडीतसें
न परि हरपलें तें गवसे ! ६

—केशवसुत



## ७४. सुंदर मी होणार !

सुंदर मी होणार, आतां सुंदर मी होणार !
सुंदर मी होणार । हो । मरणानें जगणार. ध्रु०
वर्षत्रय मम देह मरतसे, तो आतां मरणार.
वर्षत्रय मम प्राण जातसे, तो आतां जाणार.
प्राशुनि माझ्या रुधिरा हंसतो, तो व्याधी रडणार;
व्याधिक्लेशें रडतो तो मम जीवात्मा हंसणार.
हृद्रोगाच्या ज्वाला विझुनी सुख माझें निवणार;
माझा मृत्यू माझा सारा अश्रुपूर गिळणार.
कंटक-पंजर तनु-पीडेचा पिचूनिया फुटणार;
बंदिवान मम आत्मा चातक सुखेनैव सुटणार.
जुनीं इंद्रियें, जुना पिसारा, सर्व सर्व झडणार;
नव्या तनूचें नव्या शक्तिचे पंख मला फुटणार.
त्या पंखांनीं कर्तृत्वाच्या व्योमीं मी घुसणार;
देशहिताच्या पवनसागरीं पोहाया सजणार.
प्रतिभाप्रसन्न नव बुद्धीची, चंचु मला येणार;
चंचुरूप मुरलीनें प्रभुचें काव्यगान होणार.
मम हृदयांतरिं ज्ञानफुलांचा फुलबगिचा फुलणार;
फुलांत झुलुनी आत्मदेव मम नवानंद लुटणार.
नवें ओज मज, नवें तेज मज, सर्व नवें मिळणार;
जीर्ण जुन्यास्तव कोण अत्रास्तव सुज्ञ झुरत बसणार ?
गहनोगहनीं, भुवनोभुवनीं शोधित मी फिरणार,
भूमातेला हुडकुन काढुन तद्दर्शन घेणार.

माझि भरारी विमान उडतें भरकन् तिज देणार,
परवशेतेचें जाल तोडुनी उडवुनि तिज नेणार.
उडतउडत मग, रडतरडत मग, प्रभुपाशीं जाणार,
'स्वतंत्र तिजला करा' म्हणूनी तच्चरणीं पडणार.
व्यंग देह हा यानें कामुक काम कसें पुरणार ?
पुरलें नच तें पुढतीं पुरवुन आणणार शतवार.
या जन्मीं नच मोद लाभला खेद मात्र अनिवार,
प्रीति अतृप्ता, तृप्ति अशांता जन्म मला देणार.
मृत्यू म्हणजे वसंत माझा मजवरतीं खुलणार;
सौंदर्याचा ब्रह्मा तो मज सौंदर्यें घडणार !
तळमळ हरुनी कळकळ देई मृत्यु असा दातार,
कळकळ भक्षुनि जळफळ वितरी रोग असा अनुदार.
प्रेम हांसतें, हास्य नाचतें, मृत्यूचा परिवार;
शोक क्रंदतो, भय स्फुंदतें, रोगाचा दरबार.
जगण्याच्या नव अवताराचा मरणें हा व्यवहार;
जगतें जगणें प्रभुप्रमाणें, मरणें क्षण जगणार.
मरण्याविरहित जगणें मिळवूं असा करूं निर्धार;
शाश्वत जगण्यामधें कोठचा दुःखाचा संचार.
आनंदी-आनंद जाहला, तनुक्रांति होणार !
मरणाचा परमेश्वर मजवर करुणाघन वळणार !
आनंदी-आनंद जाहला, मरतां मी हंसणार;
हांसत मरणें गोविंदाचा प्रेमपंथ ठरणार !

—गोविंद



## ७५. पूर्णाहुति

जीवनाध्वरिं पडे आज पूर्णाहुती,
येइ अन्त्येष्टिघटि, आज झालों कृती. ध्रु०

कर्मभूमीवरी अवतरुनि जीं करीं
सकल कर्में हवी आज होवोत तीं. १

कोणि आणूं नका आसवें लोचनीं,
छे ! न ही शून्यता ! पूर्णता, सद्गती ! २

आज वीणेवरी भगवती शारदा
साममन्त्रावली स्वैर आलापिती. ३

आज षड्दर्शनें मूर्त येवोनिया
वेदघोषें भरुत सवनभूमीप्रती ! ४

शंखघंटादिकीं नाद घुमवा अतां,
चौघडा द्या झडूं, या करा आरती. ५

आज पुष्पांजली स्थंडिलीं अर्पुनी
स्वस्तिवचनीं करा सांगतासिद्धि ती. ६

—भा. रा. तांबे.



# कवि-परिचय

## वसंत

पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजचे एक इंग्रजीचे सुविख्यात प्राध्यापक वासुदेव बळवंत पटवर्धन हे ‘ वसंत ’ या नांवानें कविता लिहीत असत. त्यांच्या काव्यापेक्षां त्यांचें गद्यलेखनच मराठी वाचकांस अधिक परिचित होतें. त्यांचें ‘काव्य आणि काव्योदय ’ हें पुस्तक काव्यमीमांसा करणाऱ्या मराठी पुस्तकांत फार महत्त्वाचें आहे. अंगीं असलेल्या रसिकतेच्या व विद्वत्तेच्या मानानें त्यांनीं केलेलें लेखन, विशेषतः काव्यलेखन फार थोडें आहे. परंतु इतर साहित्यिकांना स्फूर्ति देण्याचा फार मोठा गुण त्यांच्या व्यक्तित्वांत व सहवासांत होता. केशवसुतांचा आणि पटवर्धनांचा परिचय होता. पटवर्धनांचें काव्यलेखन विशेष वैभवसंपन्न नसलें तरी काव्यांतील मन्वंतराच्या जाणीवेनेंच त्यांनीं तें लिहिलें. याचमुळें खुद्द केशवसुतांना त्यांच्या काव्याचें बरेंच आकर्षण वाटत असे. पटवर्धनांच्या कवितेविषयींचा हा आदर त्यांनीं एका कवितेंत प्रकट केला आहे. साहित्यक्षेत्रांतील ज्या निवडक व्यक्तींवर केशवसुतांनीं कविता लिहिल्या आहेत, त्यांमध्यें पटवर्धन हे एक होते. केशवसुत हे स्वभावानें किती स्वयंकेंद्रित होते हें लक्षांत घेतलें म्हणजे पटवर्धनांची मैत्री व कविता त्यांना किती मोलाची वाटत असावी तें कळतें. पटवर्धनांचा जन्म इ. स. १८६१ मध्यें व मृत्यु १९२१ मध्यें झाला.

## टिळक

नारायण वामन टिळक हे फुलामुलांचे कवि म्हणून प्रसिद्ध आहेत. परंतु या संज्ञेनें सूचित होतें तेवढें त्यांचें काव्य अथवा कार्य मर्यादित नाहीं. नवीन काव्ययुगाच्या प्रवर्तनांत त्यांचें श्रेयहि कमी नाहीं. केशवसुतांनीं आधुनिक कवितेला नवीन आशय दिला, त्याचप्रमाणें टिळकांनीं तिला नवीन शैली दिली असें म्हणतां येईल. त्यांची कविता शैलीच्या दृष्टीनें इतर समकालीनांपेक्षां

अधिक प्रसादपूर्ण, लालित्यपूर्ण व निर्दोष आहे. त्यांच्या इतकी प्रसादपूर्ण, कविता दुसऱ्या मराठी कवीनें लिहिली नाहीं हे केळकरांनीं १९१४ सालीं काढलेले उद्‌गार अद्यापहि यथार्थ वाटतात. पुढील कवींवर त्यांच्या शैलीचा व रचना-पद्धतीचा बराच परिणाम झालेला दिसतो. टिळक हे स्वभावतः धार्मिक वृत्तीचे होते. त्यांचा सर्व जीवनवृत्तान्त म्हणजे एका धर्मशील माणसानें परमार्थाच्या शोधासाठीं केलेल्या प्रयत्नाचा इतिहास होय. त्यांचा जन्म इ. स. १८६२ मध्यें झाला. बालपणापासून देवधर्माकडे ओढा विशेष. तरुणपणींच सप्तशृंग (नाशिक जिल्हा) गडावरील देवीवरती त्यांनीं एक काव्य लिहिलें व प्रसिद्धहि केलें. याच धर्मशीलतेमुळें १८९५ सालीं त्यांनीं ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला. संस्कृत काव्याची छाप त्यांच्यावर सुरवातीस बरीच होती. परंतु पुढें त्यांची काव्यदृष्टि बदलली व ते नवीन धर्तीचें काव्य तन्मयतेनें लिहूं लागले. वात्सल्य, सृष्टीविषयींची आत्मीयता व मानवी जीवन पावन करणारें व्यापक प्रेम हे त्यांच्या काव्यप्रकृतीचे मुख्य भावविशेष आहेत. त्यांच्या जीवनदृष्टीप्रमाणेंच त्यांच्या काव्याचें स्वरूप सौम्य व सामान्यतः प्रसन्न असें आहे. केशवसुतां-प्रमाणें येथें क्षुब्ध झालेल्या समुद्राचीं गर्जितें ऐकूं येत नाहींत, तर मैदानावरून संथपणें वाहणाऱ्या नदीचा मर्मररव मात्र कानावर पडतो. भावगीतात्मक स्फुट कवितांप्रमाणें टिळकांनीं धर्मपर काव्यहि विपुल लिहिलें आहे. भक्तिभावनेच्या उत्कटतेमुळें तें आधुनिक मराठींत वैशिष्टयपूर्ण व संस्मरणीय गणलें जाईल यांत शंका नाहीं. निसर्गकाव्यांतूनहि टिळकांची ही धर्मपरता व तत्त्वशोधनाची प्रवृत्ति प्रकट होते. बालकवींप्रमाणें ते निसर्गाशीं सवंगड्याच्या नात्यानें समरस होत नाहींत. निसर्गाच्या सौंदर्यांतून मानवाला हितकारक असा कोठला तरी संदेश शोधतांना ते आढळतात. तुतारीच्या मालिकेंत बसणाऱ्या कविता त्यांनीं लिहिल्या आहेत; परंतु तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें ते उंच पातळीवर होते म्हणून म्हणा अथवा ते स्वतः हिंदु समाजाच्या पोलादी चौकटीबाहेर गेले होते त्यामुळें म्हणा, पण या कविता फारशा प्रभावी वाटत नाहींत. टिळकांचें श्रेष्ठ स्थान प्रासादिक रचना, फुलामुलांविषयींचें प्रेम आणि धर्मशीलता या त्यांच्या काव्यविशेषांवरच अवलंबून आहे. ते १९१९ मध्यें निधन पावले.

# केशवसुत

केशवसुत इ. स. १८६६ मध्यें जन्मले. त्यांचें संपूर्ण नांव कृष्णाजी केशव दामले हें होय. केशवसुतांचें शिक्षण प्रथम कोंकणांत व नंतर पुण्यास झालें. पुण्यास असतांना आगरकर टिळकांसारख्या शिक्षकांचा व वा. ब. पटवर्धन, हरि नारायण आपटे यांजसारख्या मित्रांचा त्यांना लाभ झाला. पुणें शहरांतील तेव्हांच्या प्रज्वलित वातावरणाचे, विशेषतः आगरकरांच्या तत्त्वज्ञानाचे गाढ संस्कार त्यांच्या मनावर व काव्यावर झालेले दिसतात. शालान्त परीक्षेनंतर प्रथम कांहीं वर्षें इतर किरकोळ नोकऱ्या करून नंतर ते शिक्षकाच्या व्यवसायांत शिरले. शेवटपर्यंत ते याच व्यवसायांत होते. १९०५ मध्यें ते हुबळी येथें प्लेगच्या आजारांत निधन पावले. त्यांची मनोवृत्ति अतिशय आत्मकेंद्रित व संवेदनशील अशी होती. परंतु स्वतःच्या सभोंवार पसरलेलें दुःख आणि समाजाची रचना यांच्यांतील संबंध ते पाहूं शकले. म्हणूनच तीव्र निराशा व्यक्त करणाऱ्या आत्मपर कवितांबरोबरच सामाजिक आशयाच्या ओजस्वी कविताहि त्यांनीं लिहिल्या. केशवसुतांना आधुनिक काव्याचे प्रवर्तक ही पदवी दिली जाते याचें एक कारण त्यांच्या काव्याचें स्वयंसिद्ध मूल्य हें तर आहेच; परंतु त्यांतूनहि महत्त्वाचें कारण म्हणजे नवीन काव्याचें स्वरूप निश्चित करण्यासाठीं त्यांनीं केलेले प्रयत्न हें होय. नव्या मनूचा भावधर्म यथार्थतेनें प्रकट करण्यासाठीं काव्यांतही सर्वदृष्टया क्रांति झाली पाहिजे याची जाणीव केशवसुतांइतकी त्यांच्या समकालीनांत इतर कोणासहि नव्हती. प्रत्येक नव्या युगांत नवा आशय निर्माण होतो. हा नवीन आशय काव्यामध्यें नवीन वृत्तांचा, नव्या संकेतांचा व नव्या भाषेचा आश्रय घेऊनच व्यक्त होण्याची धडपड करतो. ही प्रवृत्ति प्रामुख्यानें केशवसुतांमध्यें आढळते. म्हणूनच ते त्यांच्या काळाचे आणि आधुनिक मराठी काव्याचे नेते होत. कवि आणि काव्य यांजसंबंधीं केशवसुतांमध्यें जो दुर्दम्य आत्मविश्वास किंबहुना दर्प दिसतो तो या जाणीवेंतूनच जन्मास आलेला आहे. तो एका व्यक्तीचा दर्प नव्हे तर नव्या युगाच्या भावनिष्ठा नव्या शब्दांतून उद्घोषित करणाऱ्या साऱ्या कविवर्गाची ती रणगर्जना आहे. मराठींत पुढें झालेल्या बहुतेक सर्व काव्यवृत्तींचा उगम

केशवसुतांच्या काव्यांतच दिसून येतो. स्त्रीपुरुषप्रेमाचा अभिनव आविष्कार, निसर्गपूजन, गूढगुंजन, सामाजिक क्रांतीचें आवाहन, नित्याच्या घटनेंतील वा वस्तूंतील सौंदर्याशयाचा शोध वगैरे सर्व प्रवृत्ति त्यांच्या काव्यांतून उत्स्फूर्त आवेगानें व्यक्त झाल्या आहेत. नवी भाषा, नवीं वृत्तें व सुनीतासारखे नवे काव्यप्रकार त्यांनीं मराठींत रूढ करण्याचा यत्न केला. केशवसुतांनीं इंग्रजी काव्यापासून स्फूर्ति घेतली यांत शंका नाहीं, परंतु कांहीं पूर्वकवींप्रमाणें त्यांनीं त्याचें निर्जीव अनुकरण केलें नाहीं. तर तें पचवून स्वतःच्या व्यक्तित्वाचा व भावविचारांचा आविष्कार त्यांनीं स्वतंत्रपणानें आपल्या कवितेंत केला. याचाच अर्थ असा कीं केशवसुतांनीं स्वतःच्या व तदनुषंगानें सर्व मराठी कवितेस आत्मनिष्ठेचें नवें अधिष्ठान दिलें व आधुनिक कवितेचें स्वरूप निश्चित केलें.

## चंद्रशेखर

चंद्रशेखर हे नव्या काळांतील जुने कवि म्हणून विशेष मान्यता पावले. चंद्रशेखर शिवराम गोर्‍हे यांचा जन्म इ. स. १८७१ मध्यें झाला. त्यांचें पूर्वायुष्य आणि उत्तरायुष्य बडोद्यास गेलें. वयानें ते माधवानुज, तांबे, विनायक प्रभृतींच्या बरोबरीचे होते. परंतु त्या कवींवर इंग्रजी भावकाव्याचे कमी अधिक संस्कार झाले, तसे चंद्रशेखरांवर झाले नाहींत. इंग्रजी काव्याशीं त्यांचा परिचय होता, परंतु त्यांच्या प्रतिभेला जुन्या काव्याचा पंडिती थाटच अधिक मानवला. आत्मनिष्ठेचा अनावृत आविष्कार काव्यांत करणें हें त्यांच्या स्वभावास रुचत नव्हतें; तें असंस्कृतपणाचें आहे असें त्यांस वाटे. त्यामुळें केशवसुत-टिळकांच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्र काव्यांत सुरू झालेल्या नवीन आंदोलनापासून ते बहुतांशीं दूर राहिले. रविकिरणमंडळाच्या काळापर्यंत ते काव्यलेखन करीत होते. परंतु आधुनिक काव्याच्या विशिष्ट स्वरूपाशीं ते अखेरपर्यंत कधींहि समरस झाले नाहींत. पंडिती काव्याचीं वैशिष्ट्यें, म्हणजे सर्वांना पटकेल असा काव्यविषय, परंपरेनें रूढ झालेल्या वृत्तजातींचा बिनचूक वापर, अलंकारांचा विपुल उपयोग आणि घोटीव, दिमाखदार भाषा हीं होत. तीं सर्व चंद्रशेखरांच्या कवितेंत प्रकर्षानें आढळून येतात. त्यांनीं आपल्याभोंवतीं सरहद्दीची एक रेषा आखून

घेतली होती. परंतु या रेषेच्या बंधनांत त्याच्या लेखणीनें मिळाविलेलें यश मात्र विलोभनीय आहे यांत शंका नाहीं. त्यामुळेंच जुने असूनहि, नवीन कवींच्या व टीकाकारांच्या मेळाव्यांतहि ते प्रतिष्ठा मिळवूं शकले. या कालखंडांत इतरहि अनेक कवि पंडिती पद्धतीची काव्यरचना करीत होते. परंतु कित्येकांचें काव्य नव्याजुन्याचा मेळ घालण्याच्या क्षीण प्रयत्नामुळें अयशस्वी झालें तर इतरांचें काव्यगुणांच्या कमतरतेमुळें व शाब्दिक जडजंबालतेमुळें दुर्लक्षित झालें. आधुनिक काळांतहि जुनें सूत्र घेऊन पुढें जाणारे व स्थिर होणारे प्रातिनिधिक कवि म्हणून एका चंद्रशेखरांचाच निर्देश करावा लागेल. चंद्रशेखरांचें सारें आयुष्य कारकुनी पेशांत व दारिद्र्यांत गेलें. काव्यावरील निष्ठेमुळें त्यांनीं सांसारिक सुखाची व संपत्तीची फारशी पर्वाहि केली नाहीं. अखेरच्या काळांत ते बडोद्याचे राजकवि झाले. तेथेंच ते १९३७ मध्यें निधन पावले.

## विनायक

विनायक हे केशवसुतांच्या काळांतील परंतु नव्याजुन्याच्या सरहद्दीवरील कवि होत. त्यांचें संपूर्ण नांव विनायक जनार्दन करंदीकर. त्यांचा जन्म १८७२ मध्यें झाला. शिक्षण फारसें झालें नाहीं. आयुष्य पोलीस खात्यांत खानदेशामध्यें गेलें. विनायक १९०९ मध्यें म्हणजे अल्प वयांतच मरण पावले. आधुनिकांतील पहिले राष्ट्रीय कवि म्हणून विनायकांची प्रसिद्धि आहे. तत्कालीन महाराष्ट्रांतील सामाजिक आंदोलन द्विविध स्वरूपाचें होतें. स्वातंत्र्य गेलें तें केवळ दुर्दैवानें, समाजाला स्वतःच्या प्रतिष्ठेची आणि इतिहासकालीन वैभवाची जाणीव करून देऊन तें परत मिळविलें पाहिजे हें एका विचारधारेचें उद्दिष्ट होतें. तर समाजाची रचनाच अंतर्गत दोषांमुळें व अन्यायांमुळें हतबल झाली आहे, त्यांवर प्रहार करून समाज स्वातंत्र्याला पात्र करावा, आधुनिकतेचा स्वीकार करून तो प्रगतिशील करावा हें दुसरीचें उद्दिष्ट होतें. केशवसुतांवर दुसऱ्या तर विनायकांवर पहिल्या विचारधारेचा विशेष परिणाम झालेला दिसतो. विनायकांच्या राष्ट्रीय भावनेचें स्वरूप या विचारप्रवाहाशीं जुळतें, म्हणजे पूर्व वैभवाचें पूजन करणारें व आधुनिकतेविषयीं अप्रीति असलेलें असें आहे. तेव्हांच्या अनेक राजकीय

पुढाऱ्यांप्रमाणें व विचारवंतांप्रमाणें ते भूतकाळाकडे तोंड फिरवूनच उभे राहिलेले दिसतात. त्यांच्या राष्ट्रीय काव्यांतहि आशेपेक्षां निराशेचें व उत्साहापेक्षां उद्वेगाचे सूरच अधिक ऐकूं येतात. गोविंदांच्या काव्यांतील प्रखरता विनायकांत नाहीं. गोविंद हे स्वातंत्र्याच्या यज्ञकुंडाजवळ त्या दैवताचे आवाहनमंत्र गाणारे ऋत्विज होते. त्यांच्या काव्यांत प्रेरणेला व प्रोत्साहनाला विशेष महत्व आहे तें यामुळेच. विनायकांनीं राजकीय परवशतेच्या दुःखालाच विशेषत्वानें शब्दरूप दिलें आहे. काव्याच्या नवीन स्वरूपाचा त्यांनीं संपूर्णतेनें अथवा जाणीवेनें स्वीकार केला असें वाटत नाहीं नव्याजुन्याच्या सरहद्दीवर ते स्वच्छंदानें वावरत आहेत असें वाटतें. त्यांनीं लिहिलेलीं दीर्घ स्त्रीचरित्रें संस्मरणीय आहेत. ' आर्य स्त्री ' या शब्दानें सूचित होणारा आदर्श त्यांना प्रिय होता व अशाच रणशील पातिव्रत्यावर जाज्वल्य निष्ठा असलेल्या भारतीय महिलांचें गुणवर्णन त्यांनीं प्रस्तुत काव्यांतून केलें आहे. विनायकांची शैली प्रसादपूर्ण आहे. त्या मानानें त्यांच्या आशयाची व कल्पनेची झेंप मात्र मर्यादित वाटते.

## माधवानुज

माधवानुज ऊर्फ काशिनाथ हरि मोडक हे मूळचे पडघवलीचे. त्यांचा जन्म १८७१ मध्यें झाला. डॉक्टरकीची परीक्षा देऊन त्यांनीं सरकारी डॉक्टर म्हणून बरींच वर्षे नोकरी केली. महाराष्ट्रावर त्या काळीं ओढवलेल्या प्लेगच्या व दुष्काळाच्या उग्र आपत्तींचें डॉक्टर या नात्यानें त्यांना जवळून दर्शन झालें. स्वतःचे प्राण धोक्यांत घालून त्यांनीं या काळांत निःस्वार्थ लोकसेवाहि केली. पुढें ते कल्याणला स्थायिक झाले व तेथेंच स्वतंत्रपणानें व्यवसाय करूं लागले हरिभाऊ आपटे, केशवसुत, टिळक वगैरेंशीं माधवानुजांचा चांगला परिचय होता. त्यामुळेंच त्यांची काव्यवृत्ति विकासित झाली आणि अखेरपर्यंत त्यांनीं निष्ठेनें तिची जोपासनाहि केली. माधवानुजांची कविता साधी, सरळ व संथ आहे. कित्येक समकालीनांच्या काव्यांत आढळणारें भावतांडव त्यांच्या कवितेंत दिसत नाहीं. सामान्यांच्या कक्षेंत असलेल्या विषयांभोंवतीं ती सामान्य

पातळीवरूनच गुंजन करतांना आढळते. रूपकांचें आणि निसर्ग व मानव यांत साम्य-विरोध सुचविणाऱ्या कल्पनांचें त्यांना विशेष आकर्षण होतें. परंतु, त्यांच्या एकंदर काव्यावर करुणेची सावलीच अधिक पडलेली आहे. हें कारुण्य सहृदयतेंतून निर्माण झालेलें आहे. साध्या, नितळ रचनेंतून ओहळणारी त्यांची ही सहृदयता मनोवेधक आहे यांत शंका नाहीं.

## बी

'Bee' हें इंग्रजी टोपणनांव घेऊन काव्यलेखन करणाऱ्या कवीचें संपूर्ण नांव नारायण मुरलीधर गुप्ते असें होतें, ते १८७२ मध्यें जन्मले. मध्यप्रदेशांत ते सरकारी नोकरी करीत असत. त्यांची काव्यरचना संख्येच्या दृष्टीनें फार थोडी आहे, परंतु या थोड्या कवितांनीं मराठी कवींत त्यांना सन्मानाचें स्थान प्राप्त करवून दिलें आहे. ते इ. स. १९४८ मध्यें स्वर्गवासी झाले. वयानें ते केशवसुतांच्या पिढींतच येत असले तरी त्यांच्या काव्याला बहर आला तो १९११ नंतर, म्हणजे गडकरी—बालकवींच्या काळांतच. परंतु दोन्हीहि पिढ्यांतील अग्रेसर कवींची छाप त्यांच्या काव्यावर फारशी पडलेली दिसत नाहीं. तांब्यांप्रमाणेच ते आपल्या स्वतंत्र वाटेनें आधुनिक कवींच्या यात्रेंत येऊन दाखल झाले. त्यांतल्या त्यांतहि कोणा कवीशीं 'बी'ची जवळीक दिसत असेल तर ती केशवसुतांशींच होय. परंतु ही जवळीक सुद्धा मर्यादितच आहे. बींच्या कवितेचा प्रधान विशेष म्हणजे तिचा तत्त्वज्ञानाकडे असलेला ओढा हा होय. बी हे प्रमुखतः तत्त्ववेत्ते कवि आहेत, सामान्य विषयांतहि त्यांना जो मोठा आशय दिसतो तो बहुशः तत्त्वज्ञानात्मक असतो. त्यांच्या या तत्त्वज्ञानाची बैठक सर्वस्वीं भारतीयच आहे. केशवसुतांप्रमाणें पश्चिमेकडून आलेल्या आधुनिक प्रज्ञावादाचे संस्कार त्यांच्यावरती झालेले दिसत नाहींत; किंवा टिळकांप्रमाणें त्यांची वृत्ति धर्मशील व भाविकही नाहीं. त्यांच्या मनावर पगडा दिसतो तो वेदांत तत्त्वज्ञानाचा. या वृत्तीमुळेंच कीं काय, त्यांची कविता संपूर्णतः आधुनिक असली तरी स्वतःचें व्यक्तित्व त्यांनीं तिच्यापासून बव्हंशीं अलिप्त ठेवलें आहे. आधुनिक कवितेबद्दल व कवींबद्दल त्यांना गाढ प्रेम व

आदर वाटत होता आणि या प्रेमादरांतूनच ते काव्यलेखनाकडे वळले असावेत. यांची आविष्कारपद्धति संस्कृतप्रचुर, क्लिष्ट, बोजड व कित्येक ठिकाणीं बरीचशी संदिग्ध अशी आहे. विशेषतः ते जेव्हां कांहीं रूपकांची योजना करतात, तेव्हां ही संदिग्धता अधिकच जाणवते. त्यामुळें त्यांच्या कित्येक कविता वाचतांना हें कांहीं तरी चांगलें आहे, पण नक्की काय आहे तें समजत नाहीं अशी जाणत्या रसिकांचीहि अवस्था होते. 'कमळा' सारख्या कांहीं काव्यांतून मात्र त्यांच्या शैलीचें प्रौढगंभीर परंतु प्रासादिक स्वरूप प्रकट झालें असून त्यामुळें तीं रमणीय झालीं आहेत. जुन्या भारतीय तत्त्वज्ञानाप्रमाणेंच पुरोगामी सामाजिक विचारहि त्यांनीं आत्मसात् केले होते याची साक्ष अनेक कवितांतून मिळते.

## नरसिंह चिंतामण केळकर

नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर हे आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धांत साहित्य-सम्राट् या पदवीनें गौरविले जात. साहित्यलेखनांतील जी चतुरस्रता या गौरवांत अभिप्रेत आहे तींत त्यांच्या काव्यलेखनाचाहि समावेश होतो. परंतु केळकरांनीं जें काव्यलेखन केलें तें निष्ठावंत कवीच्या भूमिकेवरून नव्हे, तर काव्यप्रेमी रसिकाच्या भूमिकेवरून. काव्याचा आस्वाद केवळ बाहेरून नव्हे, तर त्याच्या अंतरंगांत संचार करूनहि घ्यावा ही वृत्ति त्यांत दिसून येते. त्यामुळेंच तें स्वभावतः बरेंच मर्यादित व अनाकांक्षी असें आहे. तरीसुद्धां, शब्दावरील प्रभुत्व, अंगांतील जन्मजात रसज्ञता आणि काव्यांतील नवीन प्रयोगांसंबंधींची आस्था यामुळें ते मनोरंजक व वाचनीय कविता लिहूं शकले. त्यांच्या 'वेषभूषे'चा गौरव तर गडकऱ्यांसारख्या चोखंदळ कवीनेंहि केला आहे. परंतु महाराष्ट्रीय काव्याच्या इतिहासांतील केळकरांचें स्थान कवीपेक्षां आधुनिक कवितेचे समर्थक टीकाकर म्हणूनच जास्त संस्मरणीय आहे. अनेक कवींच्या संग्रहांना त्यांनीं आखडत्या हातानें का होईना, पण प्रेमळ आशीर्वाद देऊन उत्तेजन दिलें आहे. खानदानी विद्वानांच्या वरिष्ठ सभागृहांत नवीन काव्यास कोणी काव्य म्हणावयासहि तयार नसतांना, केळकरांसारख्या प्रतिष्ठितांचा हा

पाठपुरावा त्यास निःसंशय उपकारक झाला. केळकरांचा जन्म इ. स. १८७२ व मृत्यु १९४७ मध्यें झाला. केसरीचे संपादक, महाराष्ट्राचे नेते आणि चतुरस्र साहित्यिक या नात्यांनीं त्यांनीं मिळविलेली विविध कीर्ति असामान्यच होय.

## तांबे

भास्कर रामचंद्र तांबे यांचा जन्म इ. स. १८७२ मध्यें झाला. वयाच्या सतराव्या अठराव्या वर्षापासूनच ते काव्य लिहूं लागले. परंतु महाराष्ट्राला त्यांच्या काव्याचा विशेष परिचय झाला तो १९२० नंतरच. त्यांचें सर्व आयुष्य महाराष्ट्रापासून दूर, म्हणजे मध्यभारत, राजपुताना व ग्वाल्हेर या भागांत गेलें. या प्रदेशांतील संस्कृतीचे, तेथील जीवनांतील मध्ययुगीन वातावरणाचे संस्कार त्यांच्या आरंभींच्या कवितेवर उमटलेले दिसतात. राजकन्या, राजकन्यांवर प्रेम करणारे मुशाफिर, किल्ले, घोडेस्वार, पराक्रमी पतीला ओवाळणाऱ्या वीरांगना वगैरे प्रकरणें त्या विशिष्ट वातावरणांतीलच होत. पुढील काळांत प्रेमाच्या मांगल्यमय आविष्काराकडे व गूढगुंजनाकडे त्यांचें लक्ष अधिक वेधलें. तांब्यांच्या काव्याचा दुसरा भाग १९२७ मध्यें प्रसिद्ध झाला. मराठी कविमालिकेतील त्यांचें उच्च स्थान याच काळांत प्रस्थापित झालें व त्यांची विशिष्ट परंपराहि कवि-वर्गांत प्रिय व रूढ झाली. गेयता, लालित्यपूर्ण पण ठसकेदार रचना, अंतर्गत संगीत, प्रचारकी अभिनिवेशाचा अभाव, भावनेच्या एकाच लकेरीचा सुश्लिष्ट पण उत्स्फूर्त आविष्कार हे तांब्यांच्या काव्याचे व त्यांच्या परंपरेचे प्रधान गुणविशेष होत. संगीत आणि काव्य यांचा अत्यंत रमणीय व यशस्वी संगम तांब्यांच्या कवितेंत झालेला आहे. त्यासाठीं संगीतानुकूल अशा अनेक जातींचा त्यांनीं नव्यानें उपयोग केला. केशवसुत आणि तांबे यांच्या काव्यांतील विरोधाची तीव्रता या ठिकाणींच विशेष जाणवून येते. यामुळेंच कीं काय, या उभयतांचे संप्रदाय भिन्न किंबहुना परस्परविरोधी आहेत कीं काय असा वाद निर्माण होतो. परंतु दोघेहि आत्मनिष्ठेचें अधिष्ठान मानणारे आहेत, दोघांचेंहि काव्य भावकाव्याच्या स्वरूपाचें आहे, दोघांचेंहि काव्य पूर्वसूरींहून संपूर्णतया वेगळें व पाश्चात्त्य काव्यापासून स्फूर्ति घेतलेलें आहे. या गोष्टी ध्यानांत

घेतल्या म्हणजे त्यांच्यांतील भिन्नत्व संप्रदायांचें नसून केवळ प्रकृतीचें आहे हें मान्य करावें लागतें. आधुनिक काव्याचा संप्रदाय हा शब्दप्रयोग जुन्या काव्याच्या संदर्भातच वापरला जातो. केशवसुत हे या संप्रदायांतील एखाद्या परंपरेचे नव्हे तर सर्व आधुनिक काव्याचेच नेते होत. या काव्यक्षेत्रांत कवींच्या प्रकृतीनुसार विविध परंपरा संभवतात—नव्हे, आहेतहि. तांब्यांचीहि परंपरा अशीच वेगळी परंतु आधुनिक काव्याच्या विस्तृत परीघांत वावरणारी अशी आहे. केशवसुतांकडे नेतृत्व आहे तें या विस्तृत परीघाचें, त्यांतील एखाद्या विशिष्ट परंपरेचें नव्हे. आधुनिक काव्याचे उद्गाते म्हणून तांब्यांचें स्थान फार मोठें किंबहुना केशवसुतांच्या शेजारींच आहे यांत मात्र शंका नाहीं. त्यांचीं काव्यें चटकन् अंतःकरणाला स्पर्श करणारीं आणि स्मृतीमध्यें सुलभतेनें स्थिर होणारीं आहेत. केशवसुतांच्या कवितेंतील रांगडेपणा अथवा 'बीं'च्या काव्यांतील बोजडपणा कोठेंहि त्यांत आढळणार नाहीं. असें असूनहि या सुश्लिष्टतेंत 'रात्रीच्या' दिव्याचा वास येत नाहीं, झऱ्यांतून उफाळणाऱ्या पाण्याप्रमाणें प्रत्येक शब्द स्वतःच्याच आवेगानें उसळी घेऊन बाहेर पडत आहे असा भास होतो. स्त्रीपुरुषांचें प्रेम आणि जित्राशित्रांचें सायुज्य हे त्यांच्या प्रतिभेचे आवडते विषय. प्रेमाच्या विविध छटांचा आविष्कार त्यांनीं आत्मगीतांतून केला, त्याप्रमाणें अनेक सुंदर नाट्यगीतांतूनहि केला आहे. इतकीं हृदयंगम नाट्यगीतें अन्य कोणी कवीनें लिहिलीं नाहींत. तांब्यांचें गूढगुंजन हें भारतीय तत्त्वज्ञानांतील अद्वैत सिद्धांतावरील श्रद्धेंतून जन्मास आलेलें दिसतें. सृष्टि आणि स्रष्टा यांच्यांतील अंतिम एकता त्यांत गृहीत असून या एकतेचा ध्यासच त्यांनीं प्रिया-प्रियकराच्या रूपकांतून विविधपणें व्यक्त केला आहे. मृत्यूच्या दारीं असतांना लिहिलेल्या प्रस्थानगीतांतून त्यांनीं जें मरणाचें मांगल्य प्रतिपादन केलें आहे, तें या श्रद्धेच्या आधारानेंच. केशवसुतांप्रमाणें समाजविषयक भावना तांब्यांच्या काव्यांतून आवेशानें प्रकट झाल्या नाहींत. याला कांहीं बाह्य कारणें देतां येतील. परंतु मुख्य कारण उभयतांच्या स्वभावधर्मांतील वेगळेपणांतच संभवतें. सौंदर्य, प्रसन्नता, संगीत व निरामय आनंद या गोष्टींना तांब्यांच्या कविप्रकृतींत प्राधान्य होतें. वास्तवाच्या पातळीवर येऊन

त्याच्याशीं कठोरतेनें धडक घेण्याची केशवसुतांचीं समर्थता म्हणा वा प्रवृत्ति म्हणा तांब्यांमध्यें नव्हती. यामुळेंच ते सामाजिक बलिदानाविषयीं वाचकाच्या मनांत कारुण्य निर्माण करतात. (उदा. विधवागीतें), केशवसुतांप्रमाणें बलिदान घेणाऱ्याविषयीं चीड वा तिरस्कार निर्माण करूं शकत नाहींत, करूं इच्छीतहि नाहींत.

## गोविंद

गोविंद कवींचें संपूर्ण नांव गोविंद त्र्यंबक दरेकर. ते नाशिक येथें रहात असत. गोविंद कवींचा जन्म १८७४ सालीं व मृत्यु १९२६ सालीं झाला. बालपणीं शालेय शिक्षणाचे संस्कार त्यांच्यावर मुळींच झाले नाहींत असें म्हटलें तरी चालेल. परंतु त्यांची प्रतिभा जन्मसिद्ध आणि प्रभावी होती. शिक्षणाचे अत्यल्प संस्कार असतांहि गुणसंपन्न साहित्य निर्माण केल्याचें उदाहरण गोविंदांशिवाय फक्त एकच दिसतें. तें म्हणजे लक्ष्मीबाई टिळकांचें होय. गोविंद प्रथमतः तमाशासाठीं लावण्या लिहीत. पुढें सावरकरप्रभृतींचे सहवासांत त्यांच्या मनानें व प्रतिभेनें वेगळें वळण घेतलें. स्वातंत्र्यशाहीर ही पदवी महाराष्ट्रकवींत कोणाला यथार्थतेनें लावतां येत असेल, तर ती गोविंदांनाच होय. पारतंत्र्याचा जळजळीत द्वेष आणि स्वातंत्र्याची अदम्य आकांक्षा हे विशेष त्यांच्या काव्यांत अत्यंत उत्कटतेनें प्रकट झाले आहेत स्वातंत्र्याची इतकी प्रखर उपासना अन्य कोणत्याहि कवीनें केली नाहीं. स्वातंत्र्यासाठीं सतीचें वाण पत्करणाऱ्या तरुणांच्या सहवासांत ते होते. त्यामुळें त्यांची कविता कर्मशीलतेंतून स्फुरण पावलेली आणि कर्मशीलतेला प्रेरणा देणारी अशी होती. विनायकांचें काव्य अधिक व्यापक आहे, कांहीं दृष्टींनीं तें अधिक गुणसमृद्धहि आहे. परंतु गोदावरीच्या तीरावर वावरलेल्या या अपंग कवीच्या काव्यांतील स्वातंत्र्याची ज्वलंत उपासना विनायकांत आढळत नाहीं. गोविंदाची स्वातंत्र्यभावना नुसती अधिक जळजळीत होती असें नाहीं, तर अधिक विधायकहि होती.

## दत्त

कवि दत्त ऊर्फ दत्तात्रेय कोंडो घाटे हे इ. स. १८७५ मध्यें जन्मले. त्यांचें वास्तव्य नगर, बडोदें व इंदूर या शहरीं होतें. बी. ए.पर्यंत शिक्षण झाल्यावर ते नोकरी करूं लागले आणि वयाच्या चोविसाव्या वर्षी म्हणजे १८९९ सालीं निधन पावले. दत्तांना काव्याप्रमाणेंच संगीताचाहि छंद फार होता आणि सतार-वादनांत तर ते चांगलेच पारंगत होते. अल्प वयांत मरण पावलेल्या या कवीची कविता स्वाभाविकपणेंच फार थोडी आहे. परंतु जी आहे, ती मात्र फार गुणशाली व पृथगात्म आहे. दत्त हे केशवसुत, टिळक, विनायक वगैरेंपेक्षां वयानें लहान होते. परंतु या ज्येष्ठ कवींपैकीं कोणाच्याही काव्याचा विशेष परिणाम त्यांच्या कवितेवर झालेला दिसत नाहीं. ती स्वतंत्रपणें स्वतःच्या वेगळ्या वळणानें वाट काढीत होती. त्यांची भाषाशैली इतर समकालीनांहून अधिक प्रसन्न व लालित्यपूर्ण आहे. कोमल भावना, रसिक वृत्ति आणि तरल कल्पनाशक्ति हीं त्यांचीं वैशिष्ट्यें होत. 'निजनीज माझ्या बाळा' व 'फुलें विकणारी पोर' यांसारख्या कवितांतून प्रकट झालेली त्यांची सामाजिकता फार हृदयंगम आहे. त्यांत आवेश किंवा तत्त्वघोष नाहीं. परंतु समाजरचनेंतील अन्यायाचें कारुण्य वाचकांच्या अंतःकरणांत बिंबविण्याचें सामर्थ्य त्यांत खचित आहे. त्यांची प्रेमकविता सरळ व कांहींशी रंगेल आहे. निसर्गाविषयींची जी रसज्ञ व लालित्यरम्य वृत्ति पुढें बालकवींमध्यें शिगेला पोहोचली, तिचें पहिलें सुंदर दर्शन दत्तांच्या कवितेंतच होतें.



# संदर्भ आणि टीपा

५. ही कविता कवितेसच उद्देशून आहे असें समजण्यांत येतें.

७. रसपूर्ण काव्याची मागणी करणाऱ्या एका रसिक मित्रास कवीनें ( १९३३ सालीं ) दिलेलें हें काव्यात्म उत्तर होय.

८. देवद्वय = ज्ञानदेव व नामदेव.

१४. मूळ कल्पना एका इंग्रजी कवितेमधील आहे.

१९. ही सबंध कविता असंगति या अलंकाराचें उदाहरण आहे.

२१. नववधू म्हणजे जीवात्मा व तिचा प्रिय म्हणजे परमात्मा असाहि अर्थ या कवितेचा घेण्यांत येतो.

२२. केशवसुतांनीं लिहिलेलें व मराठीमधील हें पाहिलें सुनीत होय.

२७. ‘ सुशीला ’ या दीर्घ कथाकाव्यांतील उतारा.

२८. ‘ जिऊ व शिवबा ’–‘ काय हो चमत्कार ’ या दीर्घ काव्यांतील उतारा.

३०. ‘ कमळा ’ या कवितेंतील उतारा.

३३. ही कविता बालकवींना, ते नगर सोडून पुण्यास गेले तेव्हां, उद्देशून लिहिली असल्याची समजूत आहे.

३४. विश्वामित्री ही नदी बडोदें शहराजवळ आहे.

३५. गंगाद्वार, त्र्यंबकच्या डोंगरावरील गोदावरीच्या उगमस्थानाचें नांव.

३८. ‘ वनवासी फूल ’ या दीर्घ काव्यांतील उतारा.

४२. माल्यकूट,रत्नागिरी जिल्ह्यांतील मालगुंड गांव, केशवसुतांचें जन्मस्थळ.
जगदुद्धरा–मूळ ‘ जगबुडी ’ या नांवाचें कवीनें केलेलें रूपांतर.

४३. तांब्यांच्या महा–प्रस्थान–कवितांपैकीं एक.

४६. ‘ अमृत ’–ज्ञानेश्वरांचा ‘ अमृतानुभव ’ वा ‘ अनुभवामृत ’ हा ग्रंथ. ‘ परंपरा आर्यांची ’ वगैरे शब्द सुधारक–सनातनी वादांत महत्त्व पावलेले शब्द होत.

५१. स्त्री आणि स्त्रीजाति हा या कवितेचा विषय आहे.

६२. श्रीकृष्ण–जन्मोत्सव या कवितेंतील उतारा.

६७. अमेरिकन कवि अेडगर ॲलन पो. याच्या सुप्रसिद्ध ‘ Raven ’ या कवितेच्या आधारें लिहिलेली कविता.

७४. कवि गोविंदांची ही मरणापूर्वीची कविता.

---

